# अनुक्रमणिका.

## कृतज्ञतेचे दोन बोल-


शस्त्रांचें जतन ... ... ... ... १
कै. श्रीमंत पूज्य सर सयाजीराव महाराज ... ... १
पहिली समिति ... ... ... ... १
खड्ग परिक्षा ... ... ... ... २
माझ्या मनावरील पकड ... ... ... ... २
दुसरी समिति ... ... ... ... २
तिसरी समिति ... ... ... ... २
श्रीमंतांची आवड ... ... ... ... ३
श्रीमंतांचे परीश्रम ... ... ... ... ३
दोन तीन गोष्टी ... ... ... ... ३
शस्त्रांचें प्रदर्शन ... ... ... ... ३
कर्नल कुमार शिवराजसिंघसाहेब ... ... ... ४
परीक्षणार्थ शस्त्रें ... ... ... ... ४
उमा-सभागृह उद्‌घाटन ... ... ... ... ४
कै. श्रीमंत खंडेराव महाराज ... ... ... ४
लहानगें पुस्तक ... ... ... ... ५
काम एकट्याचें नाहीं ... ... ... ... ५
श्रीमंतांनीं स्वतः केलेली विचारपूस ... ... ... ५
नेक नामदार दिवाणसाहेब ... ... ... ५
कर्नल कुमार शिवराजसिंघजींची जिज्ञासा व प्रेम ... ... ६
मे. रा. रा. दमाजीराव गायकवाड ... ... ... ६
व्यायाम मंदिर बंधुवर्ग ... ... ... ... ७
अहिल्योद्धार ... ... ... ... ७
श्रीमंतांचा पुण्यस्पर्श ... ... ... ... ८
शस्त्रागार अमलदार ... ... ... ... ८
श्री प्रतापशस्त्रागार ... ... ... ... ८


## प्राथमिक विवेचन-


ज्याचा दंडा त्याचा हंडा ... ... ... ... ११
संघटनेचा जोर ... ... ... ... ११
मनुष्याचें बुद्धिवैभव ... ... ... ... ११

पानांक


नव्या योजना ... ... ... ... १२
काल निश्चिति ... ... ... ... १२
शिलाकाल ... ... ... ... १२
लोहकाल ... ... ... ... १२
अस्त्रकाल ... ... ... ... १३
मल्लविद्याकाल ... ... ... ... १३
ओझरता समारोप ... ... ... ... १३
लोखंडाचा उपयोग ... ... ... ... १३
ऋग्वेद व लोखंड ... ... ... ... १३
ऋग्वेद व शस्त्रें ... ... ... ... १४
ऋग्वेदांतील वस्तन्यांचें वर्णन ... ... ... १४
वेद व करवाल ... ... ... ... १४
संस्कृत नांवें ... ... ... ... १४
भाला ... ... ... ... ... १५
चक्र ... ... ... ... ... १५
भाल्याचें माहात्म्य ... ... ... ... १६
भाल्यांचे पवित्रे ... ... ... ... १६
भाल्यांचे प्रकार ... ... ... ... १६
खड्ग ... ... ... ... ... १७
खड्गांचे तीन प्रकार ... ... ... ... १७
खांडा ... ... ... ... ... १७
धोप ... ... ... ... ... १८
खंजीर ... ... ... ... ... १८
खंजिराचे पवित्रे ... ... ... ... १८
नागपाश ... ... ... ... १९
मुद्गल ( जोड्या ) ... ... ... ... १९
युद्ध कुऱ्हाड, ( बॅटल ॲक्स ) ... ... ... १९
बाण ... ... ... ... ... २०
बाणांची महत्ता ... ... ... ... २०
गोळ्यांचा खेळ ... ... ... ... २१
दगडी युगाचें द्योतक ... ... ... ... २१
आत्मसंरक्षण ढाली ... ... ... ... २२
लोखंड पोलाद विचार ... ... ... ... २२
वीर चिंतामणीचें मत ... ... ... ... २२
सांग लोहाचे प्रकार ... ... ... ... २२
निरंग लोहाचे प्रकार ... ... ... ... २२

पानाक

पोलादाची व्याख्या ... ... ... ... २३
कोणत्या ठिकाणचें लोह योग्य ... ... ... २३
विविध देशीय तलवारींचें वैशिष्ट्य ... ... ... २३
मुसलमानी तलवारी ... ... ... ... २३
पोलादाचे प्रकार ... ... ... ... २४
हिंदी पोलादाची किंमत ... ... ... ... २५
पोलादाची परीक्षा ... ... ... ... २५
पोलादाचा रंग ... ... ... ... २५
दमास्कस पोलादी तलवारी... ... ... ... २५
जुन्या लोकांचे परिश्रम ... ... ... ... २५
परमेश्वरचरणीं प्रार्थना ... ... ... ... २६

## श्री प्रतापशस्त्रागारांतील कांहीं अमोलिक व दुर्मिळ शस्त्रें–

अब्बासी अलेमान तलवार... ... ... ... २९
अलेमान तुर्की ... ... ... ... २९
अलेमान निमचा तलवार ... ... ... ... ३०
ऊनाशाई ... ... ... ... ३०
कत्ती ... ... ... ... ... ३१
करवती मगरी ... ... ... ... ३१
किरच नं. १ ... ... ... ... ३१
किरच नं. २ ... ... ... ... ३२
खांडा ... ... ... ... ... ३२
खुरासानी ... ... ... ... ३३
गद्दारा ... ... ... ... ... ३३
चतुर्भुजी तलवार ... ... ... ... ३४
जफरतकिया ... ... ... ... ३४
जनुची ... ... ... ... ... ३४
जव्हेरदार इराणी गोलिया ... ... ... ... ३५
जुनी गुजरात ... ... ... ... ३५
जुल्फुकार ( दुद्दा ) समशेर ... ... ... ३६
तिराघाटी सुरा ... ... ... ... ३६
तुर्की चमनबंदी तलवार ... ... ... ... ३७
तेगा ... ... ... ... ... ३७
दशावतारी तलवार ... ... ... ... ३७
नागन ... ... ... ... ... ३८
निमचा ... ... ... ... ... ३८

दुमाला ... ... ... ... ... ५३

खजाना... ... ... ... ... ५३

पेटा ... ... ... ... ... ५४

पिपळा... ... ... ... ... ५४

नोंक ... ... ... ... ... ५४

धार ... ... ... ... ... ५४

पाठ ... ... ... ... ... ५५


## मुठीचें वर्णन —


मुठीचें महत्व व भाग ... ... ... ... ५५

मोगरा ... ... ... ... ... ५५

चतासा... ... ... ... ... ५६

वाटी किंवा कटोरी ... ... ... ... ५६

पुतळ्या ... ... ... ... ... ५६

ठोले ... ... ... ... ... ५६

नख्खे ... ... ... ... ... ५६

चौक ... ... ... ... ... ५६

परज ... ... ... ... ... ५७

कंगणी ... ... ... ... ... ५७

कंठी ... ... ... ... ... ५७

जनोई ... ... ... ... ... ५७

मुठीचे प्रकार ... ... ... ... ५७

मुठीचें वर्णन ... ... ... ... ५८

दिल्लीशाई मूठ ... ... ... ... ५८

औरंगजेबी मूठ ... ... ... ... ५८

सिंधी मूठ ... ... ... ... ५८

हकीमखानी मूठ ... ... ... ... ५८

बंगला मूठ ... ... ... ... ५९

गुजराती मूठ ... ... ... ... ५९

पुरबिया मूठ ... ... ... ... ५९

जोधपुरी अथवा करनशाई मूठ ... ... ... ६०

भुजी मूठ ... ... ... ... ६०

सिरोही मूठ ... ... ... ... ६०

मुल्हेरी अथवा महाराष्ट्रीय मूठ ... ... ... ६०

कर्नाटकी मूठ ... ... ... ... ६०

इराणी मूठ ... ... ... ... ६१

पानांक
इराणी नकली मूठ ... ... ... ... ६१
इराणी पोपट–घाटाची ... ... ... ... ६१
शेरदहां मूठ ... ... ... ... ६१
सुराघाटी मूठ ... ... ... ... ६१
इंग्रजी मूठ ... ... ... ... ६२
रामपुरी मूठ ... ... ... ... ६२
गारदी मूठ ... ... ... ... ६२
उदेपुरी मूठ ... ... ... ... ६२
दक्षिणची मूठ ... ... ... ... ६२
जाफराबादी मूठ ... ... ... ... ६२
अरबीघाट मूठ ... ... ... ... ६३
अनेकविध मुठी ... ... ... ... ६३
धातूच्या मुठी ... ... ... ... ६३
मुठ कशी असावी ... ... ... ... ६३

## मूठ बसविण्याची रीत —

पूर्व तयारी ... ... ... ... ६४
पान बसविणें ... ... ... ... ६४
शिकारी मूठ ... ... ... ... ६४

## म्यान —

म्यानाची उपयुक्तता ... ... ... ... ६४
म्यानाचे प्रकार ... ... ... ... ६५
लाकडाची जरूर ... ... ... ... ६५
चांगलें लाकूड ... ... ... ... ६५
सेवनचें लाकूड ... ... ... ... ६६
हलका व अहुलका ... ... ... ... ६६
ओक, देवदार व आंबा ... ... ... ... ६६
म्यानावरील कापड ... ... ... ... ६६
चामड्याचें म्यान ... ... ... ... ६७
दरबारी म्यान ... ... ... ... ६७
राजेशाही म्यान ... ... ... ... ६७
फीत व गोफ ... ... ... ... ६७
तारफणी ... ... ... ... ६७
तेनाल म्हणजेच कबजा ... ... ... ... ६८
तलवारी कशा बांधीत ... ... ... ... ६८
मखमलीचें म्यान ... ... ... ... ६८

पानांक

मजुरी ... ... ... ... ... ६८
शोभा ... ... ... ... ... ६८
गलतनी ... ... ... ... ६९
म्यानाची व्यवस्था ... ... ... ... ६९
तलवारीची व्यवस्था ... ... ... ... ६९
पट्टापान ... ... ... ... ६९

## तलवारींची परीक्षा–

तलवारीचे चार रंग ... ... ... ... ७०
तलवारीचीं अष्टांगें ... ... ... ... ७०
अष्टांग विचार–
अंग ... ... ... ... ... ७०
रूप ... ... ... ... ... ७०
जाति ... ... ... ... ... ७०
ब्राह्मण तलवार ... ... ... ... ७०
क्षत्रीय तलवार ... ... ... ... ७१
वैश्य तलवार ... ... ... ... ७१
शूद्र तलवार ... ... ... ... ७१
नेत्र ... ... ... ... ... ७१
तीस प्रकारचे नेत्र ... ... ... ... ७१
अरिष्ट ... ... ... ... ... ७२
शुभ तलवारी ... ... ... ... ७२
भूमि ... ... ... ... ... ७२
दिव्यलक्षणी खड्ग ... ... ... ... ७३
भौम खड्ग ... ... ... ... ७३
औशनस धनुर्वेदांतील तलवारीच्या तीन भागाचें वर्णन ... ... ७४
तलवारींचें योग्य मोजमाप... ... ... ... ७५
पवित्रे ... ... ... ... ... ७५
तलवारीचे हात ... ... ... ... ७६
जव्हेरदार, अभ्रदार तलवारी ... ... ... ७७
जव्हेर कसें देतात ... ... ... ... ७७
जव्हेर पानावर कसें उमटतें ... ... ... ७७
सकेला तयार करण्याची कृति ... ... ... ७८
खंडेराव महाराज व सकेले... ... ... ... ७८
पोलादास वठोण पाणी ... ... ... ... ७८
जव्हेर भरण्याचीं स्थळें ... .. ... ... ७९

पानांक

कसीस म्हणजे काय ? ... ... ... ... ७९
इराणी लुकण व कसीस ... ... ... ... ७९
आपल्याकडील कसीस लावण्याची कृति ... ... ... ७९
जव्हेराचे प्रकार ... ... ... ... ८०

## उपसंहार

...८१ ते ८५

## परिशिष्टें–

१ शिकल करण्याबद्दल ... ... ... ... ८६
२ कांहीं महत्वाच्या गोष्टी ... ... ... ... ८९
३ मुठीवर चांदी सोन्याचा वर्ख चढविण्याबद्दल व रसाण्याचे कामाची माहिती ... ९१
४ मुठीवर कोरीव काम करणें ... ... ... ९६
५ तलवारीवर नक्षीकाम ... ... ... ... ९७
६ हस्तिदंती मुठीची सफाई... ... ... ... ९८
७ शस्त्राला लावण्याचें तेल ... ... ... ... ९९
८ शस्त्रांना देण्याचा धूप ... ... ... ... १००
९ शस्त्रदेवीचें स्वरूप ... ... ... ... १०२
१० श्री प्रतापशस्त्रागारांतील कांहीं अमोलिक हत्यारांचीं नांवें ... ... १०५

तलवार वीराचें भूषण आहे.

# प्रकाशकाचें मनोगत.

**श्रीमंत सरकार सर प्रतापसिंह महाराज बडोदें राज्याच्या गादीवर विराजमान् झाल्याबरोबर श्रीमंतांनीं ज्या अनेक उपयुक्त गोष्टी केल्या** त्यापैकींच **शस्त्रसंजीवन-विद्या ही एक होय.** पुरातन काळचीं जीं **अमूल्य** शस्त्रें बडोद्यांत ठिकठिकाणीं पडून होतीं, तीं सर्व एकत्रित करण्याची आज्ञा करून त्यांची उत्तमरितीनें सफाई व तेजाळणी करवून, त्या प्रत्येकाचें **ऐतिहासिकदृष्टया संशोधन** करून, तीं योग्य स्थळीं यथोचितरितीनें लावून ठेविण्याची कामगिरी **श्रीमंतांनीं** आपल्या येथील **शस्त्रशास्त्रज्ञ** राजरत्न प्रो. माणिकराव यांस सोंपविली. तसेंच आपल्या **प्राचीन संस्कृतीचीं हीं तेजस्वी स्मृतिचिन्हें जोपासनापूर्वक** मांडण्यास स्वतःच्या **लक्ष्मीविलास राजवाड्यांतच** जागा दिली, यावरून **श्रीमंतांचा** त्याबद्दलचा **आदर व अभिमान** व्यक्त होतो.

इतकेंच नव्हे, तर या **शस्त्रांवर एक पुस्तक लिहिण्याचीही श्रीमंतांनीं प्रोफेसरसाहेबांस आज्ञा केली हें आमच्या मतें सर्वथैव उचित् होय.** प्राचीन **विद्येचें** व **कलेचें पुनरुज्जीवन** ही **श्रीमंतांच्या अंतःकरणांतील महत्त्वाची गोष्ट होय.** त्यामुळें या विषयाबद्दल लोकांत अभिरुची उत्पन्न होऊन त्याबद्दलचें त्यांचें ज्ञान वृद्धिंगत होण्यास चांगलीच मदत होणार आहे. राजरत्न प्रो. माणिकराव यांचे या विषया-वरील परिश्रम व ज्ञान विश्रुतच आहे. त्यामुळें असें पुस्तक लिहिण्यास त्यांची निवड **श्रीमंतांनीं** केली हें खरोखर योग्य होय. **समग्र ग्रंथ वाचल्यावर** आमच्या या विधानाची सत्यता प्रत्येकाचे प्रत्ययास येईल अशी आमची खात्री आहे. या ग्रंथांत त्या त्या **शस्त्रांचीं सुंदर चित्रें** दिल्यानें तें फार **सुबोध** व **आकर्षक** झालें आहे,

तल्वारींची व इतर शस्त्रांची किंमत त्यांत **जडविलेल्या हिरे, मोती वगैरे जवाहिरावर** आहे, अशी सामान्य जनतेची जी समजूत आहे ती बरोबर नाहीं, हें या ग्रंथांतील सशास्त्र विवेचनावरून कळून येईल. हत्यारांचें **पोलाद, जव्हेर अभ्र व माळा** यावरच त्यांचें खरें मूल्य अवलंबून असतें, ही गोष्ट तें वाचल्यानें विदित.

**आमचे महाराजांचा विचार सशास्त्रदृष्टीनें शस्त्रागार** तयार व्हावें व त्यांत **पूर्वीच्या वीरांचीं आयुधें** व **चित्रेंही मिळाल्यास तीं जमवावीं** असा आहे. अर्थात् त्यांच्या **दुर्मिळत्वामुळें** हें काम एकदम होणें कठीण आहे हें उघड होय. तरी याच तत्त्वावर **" श्री प्रतापशस्त्रागार "** करण्याचें योजिलें आहे. म्हणून त्यांत **नसलेली सर्व जुनी लहानमोठीं शस्त्रें मिळविण्याचा** आम्हीं प्रयत्न करणार आहोंत.

या **श्री प्रतापशस्त्रागारांतील** शस्त्रांची विधीपूर्वक **पूजा व त्याचा नामकरण-विधि श्री. युवराज फत्तेसिंगराव यांचे शुभहस्तें गेल्या फाल्गुन शुद्ध ६ स ( ता. १८ मार्च १९४१ रोजीं )** करविण्यांत येऊन **श्रीमंत महाराजसाहेबांचेंच नांव त्यास देण्यांत आलें आहे.** हिंदुस्थानांत व युरोपीय देशांत असे शस्त्रागार ( शिलेखाने ) अनेक ठिकाणीं आढळतात. **एडवर्ड बादशहा** यांच्या **बकिंगहॅम राजवाड्यांत एक शस्त्रागार आहे.** व तेथें **पौर्वात्य** व **पाश्चिमात्य ऐतिहासिक शस्त्रें** बरीच आहेत. याबद्दल मागें एका इंग्रजी मासिकांत चित्रासहित एक लेखही आला होता. आपणांकडे **हैद्राबाद, म्हैसुर, ग्वाल्हेर, जोधपूर, जयपूर, बिकानेर, उदेपूर, अक्कलकोट, कोटा, धार** वगैरे **संस्थानांतून** तसेंच **दिल्ली, कलकत्ता, मुंबई** वगैरे ठिकाणीं **पदार्थ-संग्रहालयांत**ही अशीं शस्त्रें मांडून ठेविलेलीं आहेत.

वेळोवेळीं आनंद व समाधान प्रदर्शित केलें हें लिहिण्यास आनंद वाटतो. या कामीं प्रोफेसरसाहेबांनीं विस्तृत व सर्वसंग्राहक असें नवीन प्रकारचें एक रजिस्टर तयार केल्यानें एक उत्कृष्ट सूचि म्हणून तें फार उपयोगी झालेलें आहे. सोंपविलेलें काम उत्तम प्रकारें केल्याबद्दल राजरत्न प्रो. माणिकराव यांस मी अनेक धन्यवाद देतों. श्रीमंतांच्या इच्छेप्रमाणें " श्री प्रतापशस्त्रागार " आदर्श बनविण्यास ते नेहमीं मदत करतीलच अशी खात्री आहे.

हें पुस्तक अशा तज्ज्ञांकडून लिहून निघालें असल्यानें त्याचा उपयोग सर्वांस होईल असा भरंवसा आहे. ग्रंथ अत्यंत सुंदर व उद्बोधक झाला आहे. बंदुकीचा शोध लागण्यापूर्वी आमची शस्त्रविद्या किती उच्च कोटीस गेली होती, हें या ग्रंथावरून सहज लक्षांत येईल.

श्रीमंत महाराजसाहेबांनीं कृपावंत होऊन शस्त्रविद्येचें साहित्य प्रसिद्ध करण्यास जें प्रोत्साहन दिलें त्याबद्दल मी श्रीमंतांचा अत्यंत ऋणी आहे.

वडोदें,<br>ता. ३०-८-४१.

दमाजीराव विठ्ठलराव गायकवाड.

अजिताः स्याम शरदः शतम्
अदीनाः स्याम शरदः शतम्

भावार्थ:-दुसऱ्यांकडून जिंकले न जातां व दुसऱ्यांपुढें दीनवाणे न बनतां आम्ही येथें शंभर वर्षे जगूं.



"असि, कृपाण, खण्डो, खडक,
तुपक, तवर अरु तीर।
साहिब सिरोही सहति,
यही हमारे पीर॥"

जवाहीरखान्यांतील जडाऊं हत्यारें



१, १३, १४ पेशकवज. २ जंबिया. ३, ५, ७, १० कट्यारी. ४ अलेमान निमचा. ६ सकेला. ८, ९ किरच. ११ पिंपळपानी कट्यार. १२ तेगा. १५ इराणी. १६ तिमीर.. १७ गुप्तीचें म्यान. १८ गुप्ती.

श्री

# कृतज्ञतेचे दोन बोल.

---

शस्त्रांचें जतन.

इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें ह्मणतात तें खरें आहे. आजचा काल शस्त्रविद्येपलीकडचा ह्मणजेच अस्त्रविद्येचा आहे. या कालांत अर्थात् शस्त्रविद्येचें महात्म्य कमी लेखिलें जाणें सहाजिक आहे. परंतु महात्म्य जरी कमी लेखिलें गेलें तरी त्यामुळें ती विद्या किंवा तिचीं आयुधें कांहीं कमी संस्मरणीय, कमी उपयुक्त, किंवा निव्वळ उपेक्षणीय ठरतात असें नाहीं. उलट, आपल्या पूर्वजांनीं ज्या या शस्त्रविद्येच्या बलावर आपल्या देशाचे कीर्तींत भर टाकली तीं शस्त्रविद्येंतील आयुधें अभिमानपूर्वक जतन करून त्यांची निष्ठापूर्वक जोपासना करणें ही एक भावी पिढीसाठींची अमोल कामगिरी आहे यांत संशय नाहीं.

कै. श्रीमंत पूज्य सर सयाजीराव.

या जबाबदारीची थोडीफार जाणीव कै. श्रीमंत पूज्य **सर सयाजीराव महाराजसाहेब** यांना होती असें वाटतें; कारण त्यांनीं तीन वेळां समित्या नेमून या विषयास थोडी चालना देण्याचा प्रयत्न केला होता.

पहिली समिति.

पहिली समिति ह्मणजे त्यांनीं ठाकूर कप्तान बस्तीसिंहजी, खानगीखात्यांत असलेले विद्वद्मान्य शंकर मोरो रानडे आणि मानकरी मिया मोसम यांचेकडेस संस्कृत व पर्शियन भाषेंतील ग्रंथांचे आधारानें आपल्या शस्त्रागारांतील शस्त्रांची यादी जरूर तितक्या माहिती-सह करण्याचें काम सोंपविलें ती. यावरून ही जुनी मंडळी जुन्या कारागीर लोकांकडून व आठवतील त्या तज्ज्ञ लोकांकडून मिळेल ती माहिती गोळा करण्यास लागली. माझे गुरू पूज्य जुम्मादादा यांचेकडेही ही समिति माहिती मिळविण्यासाठीं आली होती.

खड्ग परिक्षा.

तेव्हां या गोष्टीच्या चर्चेनें या विषयाबद्दल माझे मनांत कुतूहल उत्पन्न झालें. याच वेळीं शस्त्रागारांतील शस्त्रांची पाहणी करण्याची सुसंधी मिळाल्यानें या विषयाबद्दल मला विशेषच प्रेम वाटूं लागलें. शक्य तितकीं शस्त्रागारें पाहण्याचें ठरवून मी त्याप्रमाणें शक्य तितकीं पाहिलींही. परिणाम असा झाला कीं, आपल्यापाशींही ल्हानसेंच कां होईना पण शस्त्रागार असावें अशी तीव्र इच्छा मला होवूं लागली आणि त्याप्रमाणें एक चिमुकलें शस्त्रागार तयारही झालें. माझें शस्त्रागार होवूं लागलें व इकडे कप्तान वस्तीसिंहजी यांनीं सन १९०४ मध्यें खड्ग परीक्षा नांवाचें एक छापखानी पुस्तक प्रसिद्ध केलें.

माझ्या मनावरील पकड.

या वेळेपासून या विषयाची माझ्या मनावरील पकड मला चैन पडूं देईना. यामुळें मी या विषयाचा आस्थापूर्वक अभ्यास सुरूं केला.

दुसरी समिति.

या नंतर या विषयावर विचार करण्यासाठीं **कै. श्रीमंत पूज्य सर सयाजीराव महाराजसाहेब** यांनीं सन १९२८ मध्यें खालीलप्रमाणें समिति नेमलीः—

अध्यक्षः—मे. रा. रा. कर्नल रा. सा. परब, खानगी कारभारी.

सभासदः—१. कै. कर्नल केशवराव सावंत,

२. शिकार सुप्रिन्टेन्डंट, रा. रा. आण्णासाहेब जाधव,

३. ग. य. माणिकराव.

या समितीनें एक चांगलें काम केलें व तें ह्मणजे शस्त्रांची सफाई. बगीखान्यांत शस्त्रागार लावून ठेवण्यांत यावें असाही एक ठराव या समितीनें केला.

तिसरी समिति.

नंतर सन १९३७ मध्यें तिसरी एक समिति नेमण्यांत आली. या समितीनें समिति नं. २ चा ठराव अमलांत आणून शस्त्रागार बगीखान्यांत लावलें,

आतां मात्र शस्त्रविद्येची आग्यरेषा स्पष्ट उमटलेली दिसते. **प्रजाप्रिय**

श्रीमंतांची आवड.

**श्रीमंत सरकार सर प्रतापसिंह महाराजसाहेब गायकवाड**, सेनाखासखेल समशेर बहादूर, जी. सी. आय. ई., एलूएलू. डी., हे स्वतः उत्तम प्रतीचे खेळाडू असून शिकार व शस्त्रविद्येचे परम चहाते आहेत. सेनेची व शस्त्रांची श्रीमंतांस विलक्षण आवड आहे व म्हणूनच सेनाखासखेल समशेर बहादूर ही पदवी त्यांचे बाबतींत अक्षरशः सार्थ ठरते. **श्रीमंतांचें शस्त्रागारांत अमोल अशीं कांहीं शस्त्रें आहेत.** या शस्त्रांचें इतिहास-संशोधन व वर्गीकरण करून त्यांत जीं शस्त्रें नसतील त्यांची यांत भर घालून हें शस्त्रागार आदर्श बनविण्याची श्रीमंतांची उत्कट इच्छा आहे.

श्रीमंतांचे परिश्रम.

ही इच्छा पुरी करण्यास्तव श्रीमंतांनीं बडोद्यांतील सरकारी म्हणून जीं शस्त्रस्थळें आहेत तेथील सर्व शस्त्रें एकत्र केलीं. हें करण्यासाठीं श्रीमंतांनीं स्वतः फिरण्यासही कमी केलें नाहीं. येथील पदार्थसंग्रहालयांत सुद्धां श्रीमंतांनीं स्वतः मला बरोबर नेलें होतें व तेथील त्याचप्रमाणें जवाहीरखाना व बगीखाना येथील सर्व निवडक शस्त्रें त्यांनीं एकत्र करून लक्ष्मीविलास राजवाड्यांत आणलीं आणि त्यांचें वर्गीकरण व संशोधन करण्याचें काम अशा रीतीनें सुरूं केलें. हें महत्त्वाचें व जबाबदारीचें काम मजवर एवढ्या विश्वासपूर्वक सोंपविल्याबद्दल मी श्रीमंतांचा शब्दशः ऋणी आहे.

दोन तीन गोष्टी.

हें काम लाभण्याचें भाग्य मला कां व कसें लाभलें याचा ओझरता विचार मनांत येतां दोन तीन गोष्टी डोळ्यापुढें प्रामुख्यानें येतात.

शस्त्रांचें प्रदर्शन.

अखिल-महाराष्ट्र-शारीरिक-शिक्षण-परिषदेचें बडोद्यास जें अधिवेशन झालें त्यांत शस्त्रांचें प्रदर्शन म्हणून एक विभाग ठेवण्यांत आला होता. त्या विभागाची जुळणी व मांडणी माझ्या वांट्यास आली होती. मजजवळील सर्व शस्त्रें मी या प्रदर्शनांत ठेविलीं होतीं आणि त्यांचेंच मुख्यतः हें प्रदर्शन झालें होतें. तें पाहण्यास श्रीमंतांस विनंति करतां त्या विनंतीस मान देवून श्रीमंत आले होते. प्रदर्शन श्रीमंतांस आवडलें.

श्रीमान् माननीय कर्नेल कुमार शिवराजसिंघसाहेब यांसही शस्त्रांचा बराच नाद आहे. त्यांचे समवेत या बाबतींत चर्चा करण्याचा अनेकदां प्रसंग आल्या कारणानें श्रीमंतांचें श्रवणीं त्यांचे मार्फतही माझें शस्त्रांबद्दलचें वेडें प्रेम गेलें असलें पाहिजे.

कर्नेल कुमार शिवराजसिंघसाहेब.

वरील प्रदर्शन पाहिल्यानंतर श्री. राजरत्न लक्ष्मणराव कोरडे यांचे करवीं श्रीमंतांकडून मजकडेस मधून मधून परीक्षणार्थ ह्मणजेच जातपात काढण्यास्तव शस्त्रें आलीं.

परीक्षणार्थ शस्त्रें.

या शिवाय **उमा-सभागृहाचें उद्‌घाटन श्रीमंतांचेच शुभहस्तें नावीन्यपूर्ण रीतिनें तलवारीचें सहाय्यानें झालें. त्या वेळीं श्रीमंतांनीं अशी एक सूचक सूचना केली होती कीं, हें सभागृह व्याख्यानबाजीचेंच स्थान न ठरतां खेळांची आवड उत्पन्न होण्याचें स्थळ व्हावें. त्या वेळीं श्रीमंतांस नम्रभावें मी असें अश्वासन दिलें होतें कीं, ज्या अर्थी हें सभागृह समशेर बहाद्दरांचे शुभहस्तें उघडलें गेलें आहे त्या अर्थी येथें समशेरीच लागतील. सुदैवेंकरून त्या आश्वासनानुसार त्याच या स्थळीं श्रीमंतांच्याच खास शस्त्रागारांतील अत्यंत अमोल व आवडत्या तलवारी व दुसरीं अनेक उत्तमोत्तम शस्त्रें जवळ जवळ आठ दहा महिन्यांचा मुक्काम देवून बसलीं होतीं.** अर्थात् हा भाग्यलाभ श्रीमंतांचेच कृपेनें मला लाभला यांत तिळमात्र शंका नाहीं. या अनपेक्षित भाग्याबद्दल मीं स्वतःला अगदीं कृतकृत्य समजतों.

उमा-सभागृह उद्‌घाटन.

**कै. श्रीमंत खंडेराव महाराज यांना शस्त्रांचा अतिशय नाद** होता. त्यांचे वेळीं बडोद्यांत व बडोदें राज्यांत अनेक शस्त्रें होतीं. तीं शस्त्रें जर एकत्रित करतां आलीं तर श्रीमंतांचें शस्त्रागाराची शोभा आणखी वाढेल व त्यांचें मोल अमोल होईल.

कै. श्रीमंत खंडेराव महाराज.

दो दो तरकस बांधकर, सबी कहावत शूर;
काम पडे जब देखीए, कीसके मुखपे नूर.



*मरण रुचे वीराला ।*
न रुचें अपयश मळणें ॥ १ ॥

## श्रीमंतांच्या शोकेसमधील तलवारी





१ पचाशाई. २ अलेमान पट्टणी. ३ जव्हेरदार इराणी गोलिया. ४ शिकारी. ५ नागन. ६ कत्ती रामपुरी. ७ चतुर्भुजा. ८ खुरासानी. ९ जव्हेरदार माळावाली. १० अरबीसुरा. ११ मेवाडी. १२ गुप्ती दुधारी. १३ पट्टापान. १४ किरच. १५ झुल्फुकार ( दुद्दा ).

श्रीमंतांचे सेवेंत सध्यां थोडक्यांत म्हणून शस्त्रविद्येची माहिती व श्रीमंतांचें शस्त्रागारांतील कांहीं निवडक शस्त्रांचें वर्णन या लहानग्या पुस्तकद्वारा ठेवीत आहे. संपूर्ण माहितीचें पुस्तक सेवेंत मागाहून सादर करणार आहे.

लहानगें पुस्तक.

हें लहानगें पुस्तक, या वरूनच होणारें विस्तृत माहितीचें दुसरें पुस्तक, व्यायाम मंदिरांत आलेलें श्रीमंतांचें संपूर्ण शस्त्रागार, त्यांतील शस्त्रांची परीक्षा, निवड, मतवार, साफसुफाई, मुठींची झिलाई, त्यांचेवर सोन्याचांदीचें पाणी देणें व वर्ख चढविणें, म्यानें विविध प्रकारचीं करणें, वगैरे कामें एकट्याचीं खास नव्हत. हीं कामें करण्यास प्रोत्साहन व मदत असणें अनिवार्य होतें.

काम एकट्याचें नाहीं.

काम चाललें असतां तें कोठवर आलें, त्यांत मला काय काय पाहिजे, वगैरे बाबतींत श्रीमंत स्वतः विचारपूस करीत, एवढेंच नव्हे, तर श्रीमंतांनीं अनंत कामें मागें असतां, तेवढ्यांतल्या तेवढ्यांत वेळ काढून, अगदीं आगगाडीवर जाण्याची गर्दी असतांही येवून, चाललेलें काम स्वतः डोळ्याखालीं घातलेलें पाहून काम करणाराचा उत्साह कसा द्विगुणित होणार नाहीं ? श्रीमंतांची ही जिज्ञासाबुद्धि व प्रोत्साहनच माझ्याकडून ही एवढी मोठी कामगिरी आहे या स्वरूपांत उभी करण्यास कारणीभूत झाली हें येथें नमूद करणें माझें कर्तव्य आहे.

श्रीमंतांनीं स्वतः केलेली विचारपूस.

श्रीमान् नेक नामदार सर व्ही. टी. कृष्णमाचारीअर, दिवाणसाहेब यांनींही मुद्दाम येवून चालत असलेलें काम आस्थापूर्वक पाहिलें. त्यांना तें पाहून फारच कौतुक व अभिमान वाटल्यानें त्यांनीं वडोद्यांत कोणीही राजपाहुणा किंवा सन्मान्य गृहस्थ आल्यास त्यास तें पाहण्यास्तव पाठविण्याचें जणूं व्रतच स्वीकारल्यासारखें केलें. या योगें बाहेरगांवच्या अनेक लोकांनां तें काम पाहण्यास मिळालें.

नेक नामदार दिवाणसाहेब.

श्रीमान् मान्यवर कर्नल कुमार शिवराजसिंघजी नायब दिवाणसाहेब यांना या विषयाची विलक्षण आवड आहे. काम चाललें असतां ते अनेक वेळां आले एवढेंच नव्हें तर जिज्ञासापूर्वक बारीकसारिक माहितीही घेतली. रजिष्टर व त्यांत एकत्रित केलेली नोंद पाहून तर त्यांचे नेत्रांत आनंदाश्रू चमकले. जेव्हां जेव्हां नवीन जात अगर विशेष प्रकारचें शस्त्र सांपडल्याचें त्यांना कळें तेव्हां तेव्हां ते फारच खुप होत.

कर्नल कुमार शिवराजसिंघजींची जिज्ञासा व प्रेम.

मे. रा. रा. दमाजीराव गायकवाड खानगी कारभारीसाहेब, यांनीही मला वेळीं अवेळीं मी जी मागेन ती मदत ज्या मनमोकळेपणानें व उत्साहानें केली ती पाहून मला खरोखर अत्यंत हर्ष झाला. या त्यांच्या प्रेमळ सहकार्याचे योगानें कामाच्या सुलभतेंत अमोलिक भर पडली. त्यांचेच आज्ञेनें शिकार सुपिन्टेन्डन्ट श्रीयुत् आण्णासाहेब जाधव यांची मदत मला मिळाली. हे तरुण गृहस्थ उत्साही असल्यानें आपल्या मालकाचें शस्त्रागार उत्तम व्हावें एवढ्यासाठीं आपली नोकरी संभाळून रात्रौ अकरा अकरा वाजेपावेतों सुद्धां यांनीं आपला वेळ व्यायाम मंदिरांत घालविला आहे. जवाहीरखान्याचे अध्यक्ष श्रीयुत् फडणीससाहेब व सभासद यांनीं आपल्या कवालदारांकडून सोन्याचांदीचे वर्ख करवून दिले एवढेंच नव्हे तर भरगची वगैरे जें लागलें तें सर्व तत्परतेनें पुरविलें. फर्निचर फॅक्टरीचे श्रीयुत् कदम, विद्युत्खात्याचे श्रीयुत् भट, पोलिसखात्याचें मे. रा. रा. घाटगेसाहेब, पॅलेस् एक्झीक्यूटीव्ह एंजीनियर मे. रा. रा. काझीसाहेब, रेल्वे वर्कशॉपचे अधिकारीसाहेब, लाईट फील्ड बॅटरीचे अधिकारीसाहेब वगैरेंची मदत सुद्धां उल्लेखनीय आहे. जवाहीरखाना व पोलिसखातें यांनी एक एक शिकलगीर पाठविला. शिवाय कारागीर व शिपाई हेही माझ्या हातीं देण्यांत आल्या कारणानें आणि या सर्वांनीं केवळ नोकरी म्हणून सांगकाम्याप्रमाणें काम न करतां, रजा वगैरे कांहींही न भोगतां सोंपविलेलीं कामें जीव तोडून व मनापासून केली. कामाचा उरका जर झाला असेल तर या असलया उपयुक्त मदतीच्या योगानेंच.

मे. रा. रा. दमाजीराव गायकवाड.

या शिवाय व्यायाम मंदिरांतील बंधूंचा देखील येथें उल्लेख करणें जरूर आहे. चोवीस तास मला त्यांचें सान्निध्य होतें. त्यांचे द्वारीं ही शस्त्रगंगा वहात आल्याकारणानें तिच्या घाटावरील कामगिरी त्यांनां वाटेल तेव्हां खेंचून करून घेतां आली. या बंधूंची कामगिरी थोडक्यांत खालील स्वरूपाची होतीः—

व्यायाम मंदिर बंधूवर्ग.

१. इंग्रजी, संस्कृत, हिंदी, उर्दु, फारसी, मराठी व गुजराथी या भाषांतील माहितींचीं टांचणें करणें.

२. शस्त्रशब्दकोष तयार करणें.

३. दप्तरी काम करणें.

४. शस्त्रांवर पहारा आळीपाळीनें पण चोवीस तास ठेवणें.

५. या शस्त्रांचें चार वेळां झालेलें प्रदर्शन लावणें व त्याची व्यवस्था करणें.

६. टायपिंगचें काम करणें.

७. शस्त्रांची वरचेवर मोजदाद करणें.

८. शस्त्रांचे मापन, वजन, जातवार वगैरेचें टांचण करणें;

९. चित्रांचा अल्बम तयार करणें वगैरे,

या शिवाय रिलायन्स ब्रिक कंपनीनें सदैव सहकार केला व पडेल तें काम हौसेनें केलें. एक दिलानें व एक जुटीनें काम केलें असतां तें किती जल्द व बिन-बोभाट होतें याची जरी त्यांना कदाचित् कल्पना नसली तरी त्यांची अबोल प्रात्यक्षिक सेवा माझ्या डोळ्यांपुढें सदैव राहील.

अहिल्योद्धार.

लक्ष्मीविलासांतील हें **प्रतापी प्रतापशस्त्रागार व्यायाम मंदिरांतील उमा-सभागृहांत व शस्त्रागारांत पाहण्यास्तव दररोज अनेक लोक येवून जात.** परंतु या शस्त्रागाराची अमोलिकता अशा शेंकड्यांनीं येणाऱ्या व पाहणाऱ्या प्रेक्षकांवर अवलंबून नाहीं. श्रीमंत स्वतः, नेक नामदार दिवाणसाहेब,

कर्नल कुमार शिवराजसिंघसाहेब प्रभृति मंडळींचा उल्लेख मी केलाच आहे. या शिवाय अनेक अमलदारसाहेब हें काम येवून पहात. **हिस्टॉरिकल कॉन्फरन्ससाठीं येथें आलेले परस्थ विद्वान् प्रसिद्ध इतिहास संशोधक हेही श्रीमान् नेक नामदार दिवाणसाहेब** यांनीं केलेल्या व्यवस्थेनुसार हें शस्त्रागार पाहण्यास आले होते व त्यांनींही तें पाहून नुसतेंच आश्चर्यव्यक्त केलें नाहीं तर श्रीमंतांच्या सदभिरुचीचें कौतुक केलें तेव्हां मात्र तज्ज्ञ मंडळींसही याची अमोलिकता पटल्याचा अनुभव आला, व असें वाटलें कीं, आजवर **शस्त्रविद्या ही जी शापित आहिल्यामायीप्रमाणें पाषाणवत् होवून पडली होती तिचा श्री प्रभु रामचंद्राप्रमाणें श्रीमंतांनीं आज उद्धार केला.**

श्रीमंतांचा पुण्यस्पर्श.

**श्रीमंतांचेच पुण्यस्पर्शामुळें हें प्रतापी प्रतापशस्त्रागार जन्म पावलें.** त्यांतील अमोल शस्त्रांचा पुनर्जन्म झाला, तीं तेजाळलीं, शस्त्रविद्येबद्दलची माहिती ही अशी एकत्रित झाली, तिचें ऐतिहासिक महत्त्व पटण्याचें भाग्य उदेलें, व वाङ्मयांत याला स्थान मिळण्याचा सुयोग आला, हें सर्व पाहून कोणा राष्ट्राभिमान्याचें अंतःकरण उचंबळून येणार नाहीं ? या कामगिरीबद्दल **हिंदी शस्त्रविद्या व विशेषतः महाराष्ट्रीय जनता श्रीमंतांची सदैव ऋणी राहील** यांत शंका नाहीं.

शस्त्रागार अमलदार.

हें अमोल शस्त्रागार चिरंजीव व्हावें एवढ्यासाठीं कायमच्या व्यवस्थेची जरूर खास आहे. त्यासाठीं शिकार सुपिन्टेन्डन्टसाहेब यांना नेमण्यांत आलेलेंच आहे. परंतु त्यांचे हाताखालीं जरूर ती कारागीर मंडळी, शिकलगीर वगैरेही ठेवावयास पाहिजेत.

श्री प्रतापशस्त्रागार.

तारीख १० मार्च १९४१ या शुभ दिनीं राजमहालांत खास राखून ठेविलेल्या दिवाणखान्यांत उमा-सभागृहांत साफसुफाईसाठीं आणलेला शस्त्रसंग्रह नेण्यांत आला. हाच दिवाणखाना आतां या पुढें **श्री प्रतापशस्त्रागार** या नांवानें ओळखला

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीं ।

— श्रीकृष्ण —

भावार्थः—मारितां मारितां मरावें तेणें गतीस पावावें ।
फिरोन येतां भोगावें महद्‌भाग्य ॥

— श्रीसमर्थ —



" चिड़ियों से मैं बाज मराऊं ।
तब ' गुरु गोविन्दसिंह ' कहाऊं " ॥



१ पोवारशाई. २, ९ गोलिया, ३, १८ किरच. ४, ५ वाघनख. ६ कत्ती चिमंटदार.
७, २० सुदर्शन चक्र. ८, १९ कुकरी नेपाळी. १०, १० अलेमान. ११, १५ इराणी.
१२, १४ निमचा. १३ मुग्राच. १६ शिरोही. १७ ढाल.

कपाट नं. १६



१ अर्माल. २, १२ गंबी मुग. ३ पद्माशाई. ४ जोधाना. ५ हुमंनी. ६ दशावतारी.
७ चौकला. ८ जम्रतकिया. ९ कुराणी. १० करवती मगरी. ११ पांवारशाई. १३ गुप्ती.
१४, १५ जंबिया. १६ पंचकला.

जात आहे. यांत सध्यां २० सुंदर कपाटांतून अत्यंत आकर्षक पण निरनिराळ्या तऱ्हेनें शस्त्रें लावण्यांत आलेलीं आहेत. ढाली, भाले, वगैरेचीही मांडणी चित्तवेधक करण्यांत आली आहे. श्रीमंतांच्या खास वापरण्यांत येणारी शस्त्रें, ए. डी. सी. वगैरेंना लागणाऱ्या तलवारी यांची खास व्यवस्था करण्यांत आली आहे. ती देखील उठावदार व सहजपणें शस्त्रें मिळूं शकतील अशा तऱ्हेची आहे. कपाटांवर हिंदुस्थानांतील नामांकित राजे, महाराजे, बादशाह, शस्त्रविद्या-प्रवीण तलवार-बहाद्दर स्त्रीपुरुष यांचीं चित्रें लावण्यांत आलीं आहेत. या शिवाय टेबलांवरूनही कांहीं वेंचक शस्त्रें ठेवण्यांत आलीं आहेत. शस्त्रागाराचे बाहेरच्या भिंतीवरही तलवार, तिची मूठ यासंबंधीं सर्व माहितीदर्शक मनोवेधक फळे वगैरे लावण्यांत आलेले आहेत. या शस्त्रागारावरून मनुष्य सहज गेला तरी त्याची कुतूहलबुद्धि सहजच जागृत होवून त्यास शस्त्रागार पाहण्याचा मोह अनावर झालाच पाहिजे अशी व्यवस्था आहे. शस्त्रागार—दिवाणखान्यांत गेला कीं, एवढीं शस्त्रें, अशा व्यवस्थितपणें लावलेलीं वगैरे पाहून मनुष्य अगदीं गार होतो. त्याला न कळतच त्याचे बाहू स्फुरण पावूं लागतात. त्या शस्त्रांबद्दल त्याचा अभिमान जागृत होतो. प्रत्येक शस्त्रावर त्याचें नांव व जरूर ती थोडक्यांत माहिती असल्यानें प्रत्येक शस्त्राचा इतिहास त्याचे डोळ्यासमोर उभा राहतो व शस्त्रविद्या जणूं आपणांशीं बोलतच आहे असा भास होतो. शस्त्रांची नुसती संख्याच या दृष्टीनें जरी पाहिलें तरी ती **१२०० जवळ जवळ आहे. किंमत तर खरोखर अमोल आहे. या लक्षावधी रुपये किंमतीच्या शस्त्रांचें जें रजिष्टर करण्यांत आलें आहे** त्यावरून प्रत्येक शस्त्राची लांबी, रुंदी, जात, पात, बारीकसारीक भागाची साद्यंत माहिती अशी मिळून येते. या रजिष्टराच्या योगानें कोणतेंही शस्त्र गहाळ होणें अगर न सांपडणें अशक्य आहे. या **शस्त्रागाराची उद्घाटनरूपी शास्त्रोक्त पूजा श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव यांचे शुभहस्तें तारीख १८ मार्च १९४१ रोजीं करविण्यांत आली. ता. १७ मार्च १९४१ रोजींच श्रीमंत स्वतः, नेक नामदार दिवाणसाहेब आदि मंडळींनीं यास भेट दिली व संपूर्ण समाधान व्यक्त केलें.**

याचे निरनिराळे फोटो या पुस्तकांत मुद्दाम देण्यांत आलेले आहेत. सतत एक वर्षभर या शस्त्रागाराची तयारी करण्याचें व **सेवा करण्याचें भाग्य व संधि श्रीमंतांनींच कृपावंत होवून मला दिली याबद्दल श्रीमंतांविषयींची माझ्या मनांतील कृतज्ञता पुन्हां एकदां व्यक्त करून या राजवैभवी शस्त्रागारांत जीं कांहीं थोडीफार शस्त्रें कमी आहेत तीं भरून काढण्याची** विनंति करून प्रस्तावनेदाखल लिहिलेले हे कृतज्ञतेचे दोन बोल संपवितों.

विठ्ठलक्रीडाभवन,
बडोदें, ता. २०–४–४१.

श्रीमंतांचा नम्र सेवक,
**माणिकराव.**

श्री

# प्राथमिक विवेचन.

---

ज्याचा दंडा, त्याचा हंडा.

मनुष्यप्राणी उत्पन्न झाला त्याचबरोबर त्याचे मनांत ईर्षा, आकांक्षा इत्यादि अशांतिदायक अतएव महत्वाकांक्षी भावना उत्पन्न झाल्या. यामुळेंच मनुष्य आत्मविश्वासी व ह्मणूनच लढाऊवृत्तीचा झाला. सहाजिकपणें **ज्याचा दंडा, त्याचा हंडा** ही म्हण प्रत्यक्षांत दिसूं लागली. अगदीं सत्य युग घेतलें तरी तें या म्हणीस अपवादरूप नाहीं.

संघटनेचा जोर.

मनुष्यप्राण्यास जसजसें स्थैर्य येवूं लागलें व समाज स्थापन होऊन तो निर्वेधित स्थितींत राहूं लागला तसतसें संरक्षणाच्या कार्याची विभागणी होऊन ती विशिष्ट संघाकडे गेली; तरी पण त्यामुळें व्यक्तिगत बल, धैर्य, विद्या यांचा विकास व्हावयाचें थांबलें नाहीं. मोठमोठीं राज्यें, राष्ट्रें स्थापन झालीं तरीही तीं टिकलीं तीं व्यक्तिमात्राचे संघटित जोरावरच; आणि म्हणूनच व्यक्तींचें महत्त्व केव्हांही कमी झालें नाहीं, कमी होऊं शकणार नाहीं.

मनुष्याचें बुद्धिवैभव.

मनुष्यानें निर्माण केलेल्या या संघास किंवा राष्ट्रास एकमेकांपासून सुरक्षित राहण्यास्तव निरनिराळ्या युक्त्या योजणें क्रमप्राप्त झालें व त्याचाच दृष्य परिणाम म्हणून

**१. शस्त्र, ३. शाप,**

**२. अस्त्र, ४. मल्ल.**

या विद्या निर्माण झाल्या. या विद्या म्हणजे मनुष्याच्या बुद्धिवैभवाच्या प्रणालिकाच होत.

जेथें मुत्सद्यांच्या युक्तिवादाचा अंत तेथेंच शस्त्रादि विद्यांच्या कर्तबगारीचा प्रारंभ; आणि हा दंडक अनादि कालापासूनचा आहे.

नव्या योजना.

केव्हां ना केव्हां मुत्सद्यांच्या मुत्सद्दीगिरीचा दोरा तुटणार व युद्धास प्रारंभ होणार हें भाकित कांहीं नवें नसल्यानें शस्त्रास्त्रें निर्माण करण्यांत मनुष्याचें बुद्धिसामर्थ्य शांततेच्या काळांतही मग्न असतें यांत आश्चर्य नाहीं.

शस्त्रविद्येचा काल ठरविण्यांत जरी आपणांस देवादिकांचे हातीं असलेलीं आयुधें पाहण्याचा मोह होतो तरी तीं मनुष्यकल्पित

काल निश्चिति.

असल्यानें त्याबद्दल फक्त मनुष्याच्या बुद्धिचातुर्याचेंच कौतुक करणें अधिक सयुक्तिक होईल. या पलीकडे त्यास अधिक किंमत देऊन तेवढ्यावरूनच अमुक शस्त्राचा अमुक काल म्हणणें थोडेसें धोक्याचें होईल. कोणत्याही शस्त्राचा काल ठरविणें झाल्यास त्या कालांत जीं शस्त्रें उपलब्ध असल्याचा उल्लेख व पुरावा असेल तोही विचारांत घ्यावा लागेल.

**प्रथमचा धनुर्वेद वसिष्ठ महामुनींचा सांपडतो.** त्या कालांत प्रामुख्यानें **दगडाचा** उपयोग होत असल्याचें दिसून

शिलाकाल.

येतें. **गोफणीनें दगड मारणें**, झाडें तोडून एकमेकांवर फेंकणें, **मुसळ, काठी, पाश,** एवढेंच काय पण मेलेल्या श्वापदांच्या **शिंगांनीं** हल्ला चढविणें वगैरे प्रचलित होतें. यास **शिलाकाल** म्हणावयास हरकत नाहीं.

त्यानंतर **विश्वामित्र महर्षींनीं** आणखी जास्त शोध लावून **तलवार, भाला, नारसिंहक** ( कट्यार ), **सांग,**

लोहकाल.

**धनुष्यबाण, गदा, माडू** वगैरे प्रकार निर्माण केले. परंतु ज्यापासून या वस्तु बनल्या तें म्हणजे **लोह** शोधून काढणें हेंच खरें काम होय. तें या पूर्वी म्हणजे वेदकालीं झालें होतें.

मरदां हारी मूछडी, दोदो बाल घना;
गंढक जे सो पुछडो, राखे ळोक घना.



व अलमना हो सनअता लबसिनलकुम
त ोहसेमकुमाममफ़हल अं तुम शाकेरून ।

अर्थात् और उसको यानी दाऊद को हमने
सिखाया एक तुम्हारा पहनारा ताकि बचाव हो
तुमको तुम्हारी लडाई से, सो क्या तुम शुक्र करते हो।

[ सूरत आम्बिया रकव ६ ]

— कुरान —

त्यानंतर **जमदग्नींनीं स्फोटक द्रव्यांचा शोध** लावला. हा शोध म्हणजेच **अस्त्रकाल** होय. या **अस्त्रविद्येच्या** जोरावरच **परशुराम २१** वेळां निर्वीर्य पृथ्वी करूं शकले. या विद्येचा पूर्ण प्रसार **भारद्वाज ऋषींनें** केल्याचा उल्लेख सांपडतो.

अस्त्रकाल.

**अस्त्रविद्येनें पहिला नंबर पटकाविल्यामुळें शस्त्रविद्या नंबर दोनची ठरली.** हिचा उपयोग हातघाईच्या लढाईंतच होऊं लागला. **अस्त्र व शस्त्रयुद्ध संपलें ह्मणजे मल्लयुद्ध** सुरूं होत असें.

मल्लविद्याकाळ.

आपणांस या पुस्तकांत अस्त्र, शाप, किंवा मल्लविद्या यांचा विचार करावयाचा नाहीं. फक्त **शस्त्रविद्येपुरताच** करावयाचा आहे. तरी या विद्येच्या बाबतींत थोडासा प्रस्ताव प्रस्तुत स्थळीं केल्यास अगदींच अप्रस्तुत होणार नाहीं. सबब तिच्या बाबतींत ओझरता समारोप करूं या.

ओझरता समारोप.

शस्त्रविद्या व लोखंड यांचा अन्योन्य संबंध अतिशय निकटचा असल्यानें लोखंड ही धातु प्राचीन काळीं किती वापरण्यांत येत होती याची माहिती कोठें व किती सांपडते तें पाहण्याचा प्रयत्न करूं.

लोखंडाचा उपयोग.

ऋग्वेदांत लोखंडाच्या भिंती असलेल्या शहरांचीं जीं वर्णनें आहेत त्यावरून स्पष्ट दिसून येतें कीं, त्या काळींही लोहाचा कठीणपणा चांगल्यारीतीनें अवगत होता. परंतु या वर्णनांतील विशेषणें अलंकारिकरीतीनें वापरलीं असल्यानें या धातूचा उपयोग करण्यांत येत होता असें निखालस सिद्ध होऊं शकत नाहीं. जलद् गतीनें जाणाऱ्या असुरांवर इंद्र आपलें लोखंडाचें वज्र फेंकीत आहे अशा वर्णनाच्या उताऱ्यांबद्दल किंवा ज्यांत त्याच्या **घोड्यांस लोहाचे पाय** आहेत असें वर्णन आहे त्या उताऱ्यांबद्दल हाच प्रवाद घेतां येईल. घोड्यांच्या या असल्या वर्णनावरून एवढें मात्र मानावयास जागा मिळते कीं, त्या काळींही **लोहाचे नाल** बसविण्याची चाल असावी.

ऋग्वेद व लोखंड.

तलवारी ( २·१५६ ), भाले ( ४·२५ ), बरछ्या ( २·२९२ ), घोड्यांवरून प्रहार करण्याचे भाले ( १·७७४ ) व ( ४·२·२८८ ), व कुऱ्हाडी ( १·१७५ ) यांचा उल्लेख ऋग्वेदांत उपरिनिर्दिष्ट स्थळीं सांपडतो; आणि हीं शस्त्रें सुवर्णासारखीं झगझगीत, सोनेरीं ( ४·१९ ), तेजस्वीपणें चकाकणारीं (१·१७५), प्रज्वलित ( ४·९३ ), तीक्ष्ण ( ४·११३ ) व लोहनिर्मित ( १·२२६ ) अशीं आहेत असेंही वर्णन सांपडतें.

ऋग्वेद व शस्त्रें.

या शस्त्रांची धार तीक्ष्ण करण्यासाठीं सराणीवर—सहाणेवर तीं पाजळण्यांत येतात व त्यांची तेजस्विता वाढविण्यासाठीं त्यांस उजाळा देण्यांत येत असतो. याप्रमाणें कांहीं उताऱ्यांतून वस्तऱ्यांसंबंधीं उल्लेख येतात. लोखंडाशिवाय वस्तरे बनविणें अशक्य असल्यानें असें अनुमान काढणें भाग पडतें कीं, जे लोक लोखंडाचे वस्तरे बनवूं शकत होते त्यांस या धातूंचीं तीक्ष्ण व धारेचीं शस्त्रें बनविण्याचें ज्ञान होतें व त्याप्रमाणें त्या कालीं ते बनवीत होत असें गृहित धरावें लागतें.

ऋग्वेदांतील वस्तऱ्यांचें वर्णन.

वैदिक काळापासून भारतवर्षीय वीर **करवाल व्यवहार** करीत होते असें स्पष्ट दिसतें. **वैशंपायनोक्त धनुर्वेद, वीर चिंतामणी, लोहार्णव, युक्तिकल्पतरु, बृहत्संहिता** वगैरे प्राचीन संस्कृत ग्रंथांतून करवाल किंवा खड्ग यांचें वर्णन मुबलक मिळतें. **वराहमिहिर** यांच्या **बृहत्संहितेंत तलवार** व तिचे उपयोग यासंबंधीं पूर्वी कसे लोकभ्रम होते याचीं वरीच विलक्षण उदाहरणें दिलीं आहेत.

वेद व करवाल.

**करवाल—करस्य वालं** आणि **नखं—करं आश्रित्य वलते हिनस्ति**—असें स्पष्टीकरण संस्कृत प्राचीन ग्रंथांतून सांपडतें व त्याबरोबरच खडग—तलवार याचे पर्याय म्हणून खालील नांवें दिलेलीं आढळतातः—

संस्कृत नांवें.

| | | |
|---|---|---|
| १. असि | २. खड्ग | ३. तीक्ष्ण वर्म |
| ४. दुरासह | ५. विषसन | ६. श्रीगर्भ |
| ७. विजय | ८. धर्मपाल | ९. धर्ममाल |
| १०. निस्त्रिंश | ११. चंद्रहास | १२. कौक्षेपक |
| १३. मण्डलाग्र | १४. करवाल | १५. तलवार |
| | १६. रिष्टें | |

रचनेच्या व आकाराच्या अनुसार दुसरींही कित्येक नांवें तलवारीस सांपडतात.

अधिक नांवें.

या शिवाय खालील प्रकारें करवालचा उल्लेख जुन्या संस्कृत ग्रंथांतून आढळतो.

| | | |
|---|---|---|
| १. कालखड्ग | २. नकुलांग | ३. क्षत्रवज्र |
| ४. केतकीवज्र | ५. कुटीरक | ६. कज्जलपात्र |
| ७. कालगिरी | ८. कांतिलोह | ९. धवलगिरी |
| १०. दमनवस्त्र | ११. वामनाक्ष | १२. महिष |
| १३. अंगपत्र | १४. गजवज्र | १५. महाखड्ग. |

भाला.

शस्त्र या संज्ञेंत तलवारीचा नंबर पहिला. त्यानंतर चटकन् जर कोणाचा नंबर लागला असेल तर भाला व चक्र. भाला याला इंग्रजींत जॅव्हेलिन व चक्र याला डिस्क म्हणतात. युरोपियन संशोधकांचे ग्रंथांतून भाल्यांचा उल्लेख शेला या नांवानें पुष्कळदां केलेला आढळतो. शेला याचें रूपांतर खुपसण्याचा लान्स–भाला यांत इतक्या न कळत झालेलें आहे कीं, त्याचा आकार खरोखर कसा होता हें सांगणें देखील आतां कठीण झालें आहे. यूरोपीय शस्त्रविषेंत स्पियर व जॅव्हेलिन यांच्या जरी अनेक जाती दिल्या असल्या तरी आपल्या सोईसाठीं या सर्वांचा उल्लेख भाला या शब्दाखालींच केला जातो.

चक्र.

डिस्क–चक्र किंवा काईट हें आपल्याकडील जुनें व आवडतें शस्त्र आहे. याबद्दलच्या आपल्या हिंदी भावना जरा हळुवार आहेत, कारण **श्रीकृष्णाशीं** त्यांचा संबंध येतो. शिवाय हें

शस्त्र आपणांकडील बरेंच जुनें असें मानलें जातें. याचा उल्लेख वेदांतही सांपडतो. याचा आकार हल्लीं शीख लोक जें शस्त्र वापरतात—म्हणजे तीक्ष्ण धारेची चकती-यासारखा नसून त्याच्या मध्य भागांत एकमेकांस छेदून जाणाऱ्या गाडीच्या चाकासारख्या दांड्यांनीं युक्त असा आढळतो. या योगानें तें फिरविण्यास सोपें जातें. इतकेंच नव्हे तर त्यास गती देखील अधिक मिळूं शकते व नेमही विशेष सोईस्कररीतीनें घेतां येतो असें अनुभवांतीं दिसून येतें. याचें जुनें नांव चक्र असेंच आहे. **श्रीकृष्णाचे** हातांतील या चक्रास आपण **सुदर्शन चक्र** असें म्हणतो.

भाल्याचें माहात्म्य.

भाला हें फारच महत्त्वाचें हत्यार आहे. संस्कृत ग्रंथांतून याचीं अत्यंत स्तुतिपूर्ण अशीं वर्णनें आहेत. हे भरीव बांबूचे करीत असत व त्यास पोलाद, लोखंड, किंवा तांबे यांच्या पात्याचें टोंक बसविलेलें असे. याच्या खालच्या टोंकास लोखंडाचा गोळा लावलेला असे. त्याचा उद्देश एवढाच कीं, वजन सारखें व्हावें. भारी वजनाचे भाले खुपसून मारण्यासाठीं राखून ठेविलेले असत. कांहीं भाले सबंध लोखंडाचेच केलेले आढळतात. लहान असल्यास 'सांग' म्हणतात. कांहीं कांहीं भाल्यांना पात्याखालीं लहानशीं ध्वजा लावलेली असे.

भाल्याचे पवित्रे.

भाला यास **कुंत** असेंही म्हणतात. याचे पवित्रे पांच प्रकारचे असल्याचें सांपडतें. ते पवित्रे खालीलप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १. कंठवर्त | २. कंकणा |
| ३. मुष्टावर्त | ४. कक्षावर्त |

५. तर्जन्यावर्त.

भाल्याचे प्रकार.

भाल्याचे जसे पवित्रे पांच आहेत तसे प्रकार तीन आहेत. हे तीन प्रकार तीन कारणांचे योगें अस्तित्वांत आले. हे तीन प्रकार खालीलप्रमाणें:—

तलवारीच्या खणखणांतूनच राष्ट्रें उदय पावतात.



युवास्यात् साधु युवाध्यायकः आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठः,
तस्येयं पृथिवी सकला वित्तस्य पूर्णा स्यात्।

— तै. उपनिषद् —

भावार्थः—बलवान, सामर्थ्यसंपन्न, महत्वाकांक्षी, अभ्यासशील व सत्प्रवृत्त अशा तरुणाला, सर्व संपत्तींनीं परिपूर्ण अशा पृथ्वीचें स्वामित्व प्राप्त होतें.




चित्र नं. ५, ३७

पान ३१, ४३

१. गजकुंत—ह्या प्रकारचा भाला हत्तीवरून वापरण्यांत येत असे.

२. अश्वकुंत—या प्रकारचा भाला घोड्यावरून वापरण्यांत येत असे.

३. पदातिकुंत—हा भाला सैनिक म्हणजे पायदळ वापरीत.

खड्ग.

बृहत्संहिता व युक्तिकल्पतरु या संस्कृत ग्रंथांतून खड्ग केव्हां निर्माण झालें यासंबंधी उल्लेख सांपडतो. खड्गाचीं खालील-प्रमाणें नांवें आहेत:—

| | | |
|---|---|---|
| १. रोहिणीवाल | २. यत्कुण | ३. निखद् |
| ४. मदांग | ५. वेंगीवाल | ६. रिपुदारण |
| ७. कच्छेलक | ८. भीत | ९. पट्टुलक |
| १०. तितरीपंजर | ११. कालर्पजर | १२. कोगी |
| १३. शिखरक | १४. कपोलक | १५. ग्रीवास्थान |
| १६. भूमंडल | १७. तीक्ष्णाग्र | १८. मुनय |
| १९. पंचभात वगैरे. | | |

खड्गांचे तीन प्रकार.

खड्गाचे तीन प्रकार वर्णिलेले आहेत. पहिला म्हणजे कमलांच्या पानांच्या आकाराप्रमाणें गोल, दुसरा मंडलाप्रमाणें, तिसरा कण्हेरीच्या पानाप्रमाणें सरळ. यांना तुपासारखा वास येतो, अशीं वर्णनें आहेत. तिसऱ्या प्रकाराची लांबी पन्नास अंगुळें असावी असा दंडक सांपडतो.

खांडा.

भुवनेश्वरी तलवार या वर्गांतील सर्वांत महत्त्वाचें शस्त्र म्हणजे खांडा होय. यांत खांडा म्हणजे जड, रुंद व एकेरी धारेची तलवार. चिनी लोकांची जी सेबर-नाईफ म्हणजे तलवार व सुरीचें मिश्रण अशी तलवार असते तिच्याशीं खांडा पुष्कळसा जमतो. दुर्गादेवीचें खांडा हें आवडतें शस्त्र असे. हल्लींच्या काळीं या शस्त्रांचा उपयोग यज्ञहोमादि जे केवळ औपचारिकरीतीनें करण्यांत येतात त्यावेळीं शास्त्राधार म्हणून पूजास्थानीं करण्यांत येतो. हें शस्त्र हातांत धरण्यांत येतें, कमरेस लटकावीत नाहींत. खांडा वापरूं शकतील अशा शक्तीचे हल्लीं लोकच नसल्यानें तो अवजड वाटतो.

खांड्याचेंच रूपांतर म्हणजे धोप. पण हा जरा लांब असतो. बंगालमध्यें कांहीं कालपर्यंत हें सामान्यतः उपयोगांत येणारें हत्यार होतें. आपल्या लांब, सरळ व रुंद तलवारीस मराठे खांडा म्हणत. ग्रांट डफ यांच्या मराठ्यांचा इतिहास या पुस्तकांत महान् देशभक्त **शिवाजी महाराज** यांच्या खांड्याचेंच चित्र दिलें आहे, तें फार प्रसिद्ध आहे. याचाच दुसरा भाग ओरिसा येथील शिल्पकामांत दृष्टीस पडतो. भुवनेश्वर येथील गौरीच्या मंदिरांत दोन पातींची एक तलवार आहे. ती सरळ आहे. पूर्वी दोन पातीच्या तलवारीनें जो खेळ खेळत त्यासच पुढें फिरंग हे नांव पडलें.

धोप.

ओरिसा व सांची येथील जुन्या शिल्पकृतींतून खंजीर अगर मुष्टिका म्हणजेच आंखुड तलवार या शस्त्राचे अनेक प्रकारचे नमुने दिसून येतात. वास्तविक खंजीर, सुरा, कात्यान किंवा नारसिंहक म्हणजे युद्धांत वापरण्यास योग्य अशी सुरी. हिला पॉनियार्ड, स्टीलेटो असेंही म्हणतात. भुवनेश्वर येथील भव्य मनोऱ्यावर नग्नावस्थेंतील कामुक पुतळ्यांच्या कमरेस या सुऱ्या लटकाविलेल्या दिसतात. या सुऱ्या लावून वेताचा मल्लखांब करीत असत, असेंही कांहीं ठिकाणीं सांपडतें. वेदकाली सफ्यु किंवा होमक्रियेची सुरी ही खंजीरच असे. फरक एवढाच कीं, तो लाकडाचा बनविलेला असे.

खंजीर.

खंजीर, सुरी, वरछी यांसाठीं जे पवित्रे दिलेले सांपडतात ते खालीं दिल्याप्रमाणें:—

खंजिराचे पवित्रे.

| | | |
|---|---|---|
| १. पुल्लीवाल | २. शुनक | ३. लुलीनय |
| ४. रोपीतक | ५. पोत्रांगुल | ६. व्याघ्रनख |
| ७. बादशाह | ८. पद्मास्ति | ९. अनुक्षेप |
| १०. सर्पिका | ११. भोमगति | १२. वायसी |
| १३. काकटी | १४. पंचानन. | |

अग्निपुराणांत सांगितल्याप्रमाणें तिसऱ्या वर्गांत ज्यांचा समावेश होतो अशीं शस्त्रें म्हणजे फेंकून मारण्यांत येणारीं आयुधें. या शस्त्रांत नागपाश–नागाचा पाश–याचा समावेश होतो. इंग्रजींत याला लॅसो म्हणतात. या शस्त्राला नुसतें पाश असेंही म्हणतात. याचा उपयोग बऱ्याच मोठ्या प्रमाणांत करण्यांत येत असे.

नागपाश.

न फेंकतां प्रहार करण्याच्या शस्त्रांत सर्वांत प्राचीन म्हणजे काठ्या, मुग्दल, व राजदंड हीं होत. जरी अत्यंत आणिबाणीच्या वेळीं हीं शस्त्रेंही फेंकून मारण्यांत येऊन शत्रूस नामोहरम करण्यास्तव उपयोगांत आणण्यांत येतात तरी पण सामान्यतः या कामासाठीं तीं नव्हत हें नक्की. भुवनेश्वर येथील महान् स्तंभावर अनेक प्रकारचीं मुग्दलें दाखविलीं आहेत.

मुग्दल, जोड्या.

प्राचीन यूरोपीय युद्धांत ज्याप्रमाणें भयानक व विध्वंसक युद्ध कुऱ्हाडीचा उपयोग करीत असत त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही करित असत. हिचे विविध आकार अमरावती व भुवनेश्वर येथें पाहण्यांत येतात. महान् स्तंभावर जी श्रीगणेशाची मूर्ति आहे तिचे हातांत जी कुऱ्हाड दाखविली आहे, तीवरील काम फारच कौशल्यपूर्ण आहे.

युद्ध कुऱ्हाड, बॅटल ॲक्स.

बाणविद्या ही विश्वामित्र ऋषींनीं शोधून काढली असें दिसतें. बाणाचा पूर्वज मात्र दगडच आहे. कारण गिलोलानें प्रथम निशाण म्हणजेच नेम धरून दगड मारीत असत. यांत थोडी सुधारणा होऊन बोरूचा बाण तयार करण्यांत आला. बोरूच्या बाणाचेनंतर लोहाग्र बाणांत रूपांतर होऊन संपूर्ण बाण जन्मला. बाणाच्या महत्त्वाच्या जाती खालीलप्रमाणें आहेत:–

बाण.

| | | |
|---|---|---|
| १. आरामुख | २. क्षुरम | ३. गोपुच्छ |
| ४. अर्धचंद्र | ५. सूचिमुख | ६. मल्ल |
| ७. वत्सदंत | ८. द्विमल्ल | ९. कर्णिक |

१०. काकुण्ड        ११. अण्य        १२. तेमर
१३. प्रासदीप्ताग्र        १४. नतपर्व        १५. झिल्लमटोप (शिरस्त्राण).

बाणांची महत्ता.

आरामुख या बाणानें ढालीचा चूर करण्यांत येतो. क्षुरप्र या बाणाच्या योगानें मनगटापासून हात निरूपयोगी करतां येतो. गोपुच्छ हा बाण वाटेल तेथें छेदन करतो. अर्धचंद्र याचे योगानें डोकें, मान, धनुष्य व बाण यांना नष्ट करतां येतें. सूचीमुखानें अंगावरील कवच तोडतां येतें. मल्लानें छातींतील हृदय फोडतां येतें. वत्सदंतानें धनुष्याचा गुण तोडतां येतो, द्विमल्लानें समोरच्या शत्रूच्या बाणाचा नाश करतां येतो. कर्णिकानें लोखंडाचा बाण तोडतां येतो. अशारीतीनें सर्व बाणापासून शत्रूपक्षाचा नाश करतां येत असे. पूर्वकालीं ही विद्या किती पुढें गेली होती याची कल्पना रामायण व महाभारत वाचल्यानें येते. बाणाची महत्ता समजण्यास इतक्या दूर देखील जाण्याचें कारण नाहीं. महाराजा **पृथ्वीराज चौहाण** यांनीं सात तव्यांचे पलीकडे बसलेल्या शहाबुद्दीन घोरी यांचें डोकें कसें उडविलें हें सर्वश्रुतच आहे. महाराजा पृथ्वीराज चौहाण यांच्याप्रमाणें कै. पू. श्रीमंत खंडेराव महाराज गायकवाड व उदेपूरचे खुमानसिंहजी दादा हे तीरानें तीन तवे फोडीत असत ही गोष्टही लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

गोट्यांचा खेळ.

आपण आतांच पाहिलें कीं, बाणाच्यापूर्वी दगड उपयोगांत येत असत आणि याचे रोजच्या व्यवहारांतील उदाहरण घ्यावयाचें असलें तर मुलांच्या गोट्या हें घेतां येईल. या गोट्या म्हणजे पूर्वकालीन गोळ्या होत. गोट्यांचा आज देखील लढाऊपणा दिसून येतो. कारण त्यांतील दगड मारण्याचे प्रकारास

१. एकलकाज्या,
२. दुबदुब राजा,
३. तिलातार्णी,
४. चार चौकडी,

आगे पग तो पत रहे
पीछे पग पत जात
भागा खेड़े चावड़े,
तो वाको रंग चढ़ाव ॥ १ ॥



अमल खाटण जोगपंथ, शूरा हुंदा काम;
-कायर खड्ग न वावरे, कायर दे नहीं दान.

५. पांचक पेन्डु,
६. छट्टा छेन्दु,
७. सातक सूता,
८. आठक ऊठा,
९. नवमे घोस,
१०. दसमे चोट,
११. अगीयार कराठा,
१२. बार मराठा,

अशीं नांवें आहेत तीं रुद्राऊत्रृत्ति, जोम, आत्मविश्वास, सुटसुटितपणा, व पदलालित्य हेंच दाखवितात.

दगडी युगाचें द्योतक.

दगडी युगाचें द्योतक म्हणून भोजराजाचें वेळची मोठी लाट धार संस्थानांत भोजराजाचे वेधशाळेसमोर जी पडली आहे ती आजही दाखवितां येईल. म्हैसूरकडे अद्यापि दगडाचे मलखंब आढळतात. दीड दीड दोन दोन मणाचे दगडी गोळे देखील अजून निरनिराळ्या पर्वतावर सांपडतात.

आत्मसंरक्षण ढाली.

आत्मसंरक्षणाचे आयुधांत ढालीचा नंबर पहिला लागेल. ढालीचे प्रकार खाली दिल्याप्रमाणें आहेत :—

१. गेंड्याची  २. कांसवाची
३. सिलेटची  ४. चामड्याची
५. हत्तीपगी पोलादाची  ६. साध्या लोखंडाची
७. लांकडाची.

पूर्वींच्या काळीं ढाल ही चामड्याची केलेली असे व यामुळें तिचें नांव चर्मा असें पडलें. कित्येक वेळां कठीण लांकूडही ढाल करण्यास वापरीत असत. युक्तिकल्पतरूंत चर्माची म्हणजे ढालीची व्याख्या शरीरास झांकणारें किंवा शरीराचें रक्षण करणारें शस्त्र अशी दिली आहे. ढालीची व्याख्या व उपयोग हा असा

असल्यानें तिच्यासाठीं वापरावयाचें जें लांकूड अगर चामडें तें चिवट, मजबूत, टिकाऊ व वजनानें हलकें असें पाहिजे असा कटाक्ष असे. शरीर आच्छादनास अपुरी किंवा अवजड, मऊ, सहज मोंसकली जाईल अशी, किंवा उग्र अशी ढाल दोषयुक्त मानीत.

लोखंड, पोलाद विचार.

शस्त्रविद्येचा व त्यांत समाविष्ट होणाऱ्या आयुधांचा असा थोडक्यांत विचार केल्यावर शस्त्रविद्येचा आत्मा जें लोखंड, पोलाद या विषयांचाही ओझरता विचार करणें योग्य ठरेल.

वीर चिंतामणीचें मत.

वीर चिंतामणीच्या मताप्रमाणें तलवार इत्यादि शस्त्रें निर्माण करण्यास दोन प्रकारचें लोह उपयोगी आहे.

१. निरंग
२. सांग

हे ते दोन प्रकार होत.

सांग लोहाचे प्रकार.

पुनः शार्ङ्गधर पद्धति या ग्रंथांत सांग लोहाचे मुख्य दहा प्रकार सांगितले आहेत. ते खाली दिल्याप्रमाणें :—

| | | |
|---|---|---|
| १. रोहिणी | २. मयूरसेवक | ३. मयूरवज्र |
| ४. सुवर्णवज्र | ५. स्वर्णक | ६. मौपल्वज्र |
| ७. ग्रंथीवज्र | ८. शैवालभालान | ९. नीलपिंड |

१०. तित्तिरांग.

निरंग लोहाचे प्रकार.

लोहार्णवाचें मताप्रमाणें निरंग लोह तीन प्रकारचें असतें. ते प्रकार त्यानें खालीलप्रमाणें सांगितले आहेत.

१. रोहिणी
२. पाण्डर
३. रुक्म.

रुक्म लोहास अलीकडे कांतलोह या नांवानें संबोधावयास लागले आहेत.

पोलादाची व्याख्या.

या कांतिलोहाचा अर्थच पोलाद असा आहे.

देशभेदाप्रमाणें करवालाचें म्हणजेच तलवारीचें गुणावगुण स्वतंत्र असतात.

कोणत्या ठिकाणचें लोह योग्य.

प्राचीन धनुर्वेदाचें मताप्रमाणें खालील ठिकाणचें लोह हेंच तलवारीसारखीं हत्यारें निर्माण करण्यास योग्य आहे.

| | | |
|---|---|---|
| १. खटा | २. खट्टेर | ३. ऋषिक |
| ४. वंग | ५. शूर्पारक | ६. विदेह |
| ७. अंग | ८. मध्यमग्राम | ९. वेदी |
| १०. सहग्राम | ११. चीन | १२. कालज्वर. |

विविध देशीय तलवारींचें वैशिष्ट्य.

वरील देशीय तलवारींचें पुढीलप्रमाणें वैशिष्ट्य आहे. खटी व खट्टेर देशीं करवाल अत्यंत सुंदर असतो. ऋषिक देशाचें खड्ग वजनदार असून अल्पायासानेंच शरीर छेदन करतें. वंग देशाचा करवाल अत्यंत तीक्ष्ण असतो. यानें छेदभेद करण्यास विलंब लागत नाहीं. शूर्पारक देशीय खड्ग अतिशय कठीण असतें. विदेह देशाचा करवाल तेजस्वी व प्रभावशाली असे. मध्यम-ग्रामाचें खड्ग अति तीक्ष्ण व फारच हलकें असें. चीन देशाचा करवाल तीक्ष्ण व अतिशय निर्मल असतो. कालज्वराच्या जवळ जें खड्ग बनतें तें दीर्घकाल टिकणारें, तीक्ष्ण व सुलक्षणयुक्त असतें.

मुसलमानी तलवारी.

मुसलमानी तलवारीसंबंधींही खालील माहिती मनोरंजक वाटेल. **पैगंबर-साहेब** यांचेसंबंधीं अशी दंतकथा आहे कीं, आपल्या अनुयायांचा तलवारीवर विश्वास बसावा यास्तव त्यांनीं एक चमत्कार करून दाखविला. **तलवारीनें त्यांनीं चंद्राचे अनेक तुकडे केले.** परिणाम असा झाला कीं, अनुयायांची त्यांचेवर विशेष श्रद्धा बसली; एवढेंच नव्हें, तर **चंद्राचा तुकडा म्हणजेच चंद्रकोर हें एक**

**शुभ चिन्ह ठरून तलवार ही धर्म प्रसाराचे कार्मी अवश्यक वस्तू होऊन बसली.** सन १३९८ मध्यें जेव्हां **तैमुरलंगाची स्वारी हिंदुस्थानांत आली त्यावेळीं त्यानें बरोबर वांकड्या तलवारी आणल्याचा उल्लेख सांपडतो. वांकड्या तलवारी तुर्की लोकांनीं केल्या असल्याचा पुरावा मिळतो.** तलवार उचलतांना मुसलमान लोक खालील श्लोक म्हणतातः—

सखी शाहे मरदां शेरे अरदां कुवते परवरदिगार
लाफता इल्ला अली लासयक इल्ला जुलफेकार.

मूळ विषयाकडे वळतां पोलाद किती प्रकारचें असतें यासंबंधीं जी यादी द्यावयाची ती थोडक्यांत अशी देतां येईल.

पोलादाचे प्रकार.

| | | |
|---|---|---|
| १. चंद्रवट | २. हत्तीपगी | ३. रामपुरी |
| ४. खेडी | ५. फरासी गंजवेल | ६. वट |
| ७. कामठी | ८. सिरोही | ९. गोल्या |
| १०. सालेमन | ११. तोलेदो | १२. दमास्कस |
| १३. पाटी म्हणजेच साधे लोखंड | | |

यांपैकीं सालेमन, तोलेदो व दमास्कस हें पोलाद परदेशीय आहे. आपल्या देशांतील पोलादाच्या प्रती खालीलप्रमाणें लावल्या आहेतः—




या पोलादाचाच भारत देशांत पूर्वी उपयोग होत असे. आजही याच प्रकारच्या पोलादाच्या नाना प्रकारच्या वस्तु बनविण्यांत येतात. चंद्रवट पोलादाला मोंगल लोक मोमिया असें म्हणतात.

खड्गधारी तो राज्यधारी ।



यत्र योगेश्वरः कृष्णो, यत्र पार्थो धनुर्धरः
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवानीतिर्मतिर्मम

— श्रीगीता —

भावार्थः—जेथें जेथें धनुर्धरपार्थ व योगेश्वर श्रीकृष्ण यांची जोडी जमली, तेथें तेथें संपत्ति, विजय व उत्कर्ष हीं कायमची नांदणार असें माझें मत आहे.

**नियार्कस** नांवाच्या इतिहासकारानें असें म्हटलें आहे कीं, **पोरस राजानें अति मौल्यवान् वस्तू म्हणून अलेक्झांडर बादशहास ३० पौंड पोलाद दिलें होतें.** तसेंच " हिंदी जवाब देणे " याचा अर्थ " हिंदी तलवारीनें वार करणें " आणि अशा अर्थाची म्हण आरबशाहमध्यें अरेबिक भाषेंत आजही रूढ आहे. यावरून हिंदी पोलादाची काय किंमत आहे याची थोडी कल्पना येते.

हिंदी पोलादाची किंमत.

चंद्रवट, हत्तीपगी व रामपुरी हें पोलाद इतकें कठीण असतें कीं, त्यावर काणस मुळींच चालत नाहीं. काणस लावली तर ती सरकूनच जाते. पोलादावर तिची एक रेघही पडत नाहीं.

पोलादाची परीक्षा.

चंद्रवट, हत्तीपगी व रामपुरी या पोलादाचा रंग काळा असतो. फरासी व खेडी यांचे जंगावर रंग कथ्थाई (काथ्याचा) असतो. सकेल्याच्या जंगाचा रंग काळसर कथ्थाई असतो

पोलादीचा रंग.

दमास्कस पोलादाच्या इराणी तलवारी फार नामांकित असत. मुसलमानांनी ज्यावेळीं हिंदुस्थानावर आक्रमण केलें त्यावेळीं त्यांनीं ज्या तलवारी इकडे आणल्या त्यांपैकीं कित्येक अजूनही येथें सांपडतात. हें दमास्कसी पोलाद खरोखर फार चांगलें असतें.

दमास्कस पोलादी तलवारी.

तलवारी अधिक तीक्ष्ण कशानें होतील, त्यांचेसाठीं लागणारें पोलाद अधिक चांगलें कसें निर्माण करतां येईल, कोणत्या वनस्पतींचें व कशारीतीनें पाणी दिलें तर शस्त्र अधिक तेजस्वी व मारक होईल वगैरे माहिती प्राचीन ग्रंथांतून मिळते. या जुन्या लोकांनीं या बाबतींत चांगलाच अभ्यास केला होता हें उघड दिसते. अलीकडे मात्र आपल्या भारत देशाची सर्व प्रकारें हानी झाली आहे. हिंदी संस्कृति जेथें नष्ट करण्याचे सर्वतोपरी प्रयत्न चालू आहेत तेथें ज्या शस्त्रविद्येची उघड उघड

जुन्या लोकांचे परिश्रम.

मुस्कटदाबी झालेली आहे ती विद्या व तींतील आयुधें नामशेष होत चालल्याचें व केवळ ऐतिहासिक कौतुकाचा विषय होऊन बसली असल्याचें दृश्य दिसत असल्यास नवल काय ?

परमेश्वरचरणीं प्रार्थना.

**श्रीमंत सरकार प्रतापसिंह महाराजसाहेब** यांचें शस्त्र व शास्त्रविद्या याकडे असलेलें लक्ष पाहतां मात्र निराश झालेलें मन पुन्हां आशापल्लवित होऊं पहात आहे आणि त्यामुळेंच शस्त्रें व शास्त्रविद्या यांचा पुनरुद्धार होण्याची थोडी फार सुखस्वप्नें पडूं पहात आहेत. **परमेश्वर आमच्या या नवोदित नृपतीस उदंड आयुष्य देवो व त्यांचे करवीं या शास्त्रांत अमोल व चिरस्थायी स्वरूपाची कामगिरी करवो एवढीच त्या प्रभुचरणीं मनोभावें प्रार्थना करून हें प्रास्ताविक विवेचन थांबवितों.**

---

कंथा, रणमें जायकर कांई जूए वाट।
साथी तारा तीन है, ह्यां कटारी हाथ ॥ १ ॥



"मुद्दीते चिगोयम् चिबारिन्दा मेग,
बयकदस्त गौहर, बयकदस्त तेग;
बगौहर जहां हो बया रास्ता,
बतेग अज जहां दादो दीं ख्वास्ता."

–शेख निजामुद्दीन गंजवी.–

श्री प्रतापशस्त्रागार--



पूर्व-दक्षिण बाजू



सूर्यकांत ढाल; पेशकब्ज; जमधर, कट्यार व जंबिया.

## अब्बासी अलेमान तलवार

पैगंबरसाहेबांचे काका अब्बासी यांची ही तलवार आहे. हसन, हुसेन मारले गेले त्यावेळीं ही तलवार उपयोगांत आणली असावी. ही तलवार अत्यंत विपारी असून हिचें जव्हेर चमनबंदी आहे. या तलवारीवर अब्बासी यांचें नांव उर्दूमध्यें सोनेरी अक्षरांनीं कोरलेलें आहे. हिची लांबी व रुंदी या मानानें हिचें वजन फारच कमी आहे. पोलाद दमास्कस जातीचें आहे. तलवारीची धार मसुरी आहे. हिचा पुतळा उत्तम असून नोंक चांगली आहे. मूठ औरंगजेबी असून तिच्यावर सोन्याच्या तारेचें काम केलेलें आहे. मुठीला सिंहाच्या तोंडाचा आंखूट परज आहे. मोगऱ्यामध्यें दस्ती बांधण्यासाठीं भोंक केलेलें आहे. तलवारीचें वजन मुठीसह ८५ तोळे आहे. लांबी ४०″ आहे. खजान्यांतील रुंदी २″ आहे. हिची किंमत रु. १०,००० दहा हजार आहे. हिच्या पाठीवर खालील-प्रमाणें बेत लिहिला आहेः—

“ न दो मेरी अजल मुमकिन हो,
बरा अब्बास यार मेरे आंकरे दो. ”

ही तलवार कमींत कमी १,२०० वर्षांपूर्वीची आहे. हिचा ध्वनि खणखणीत आहे.

( चित्र नं. १ )

## अलेमान तुर्की

या तलवारीचें पोलाद मोमिया जातीचें आहे. कुठें कुठें हें पोलाद गटबंदी, चमनबंदी व रामपुरी जव्हेरांचेंहि सांपडतें. अशाच तलवारी श्री प्रताप-शस्त्रागारांत तीन तऱ्हेच्या आहेत.

अलेमानचा इतिहास असा—जर्मन लोकांना फ्रेंच लोक अलेमान म्हणतात. या अलेमान तलवारी जर्मनींतच झाल्या. क्रुसेड्च्या दंगलींत या तलवारी फार नांवारूपास आल्या आणि मुसलमानांनीं त्यांची लूट केली. मुसलमान लोक अलीच्या नांवानेंच या तलवारींस संबोधींत. अर्थात् त्यांच्यात ती तलवार फारच पवित्र ठरली. हिच्याबद्दलची दंतकथा अशी सांगतात कीं, २५ तलवारीखालीं

जरी ही तलवार ठेवली व तीनवेळां **दरुद शरीफ** हा मंत्र धूप ठेवून म्हटला की, ही तलवार इतक्या खालूनहि चटकन् वर येत असे. आतांमात्र कांहीं तसा अनुभव येत नाही.

शिकल केल्यावर या तलवारीच्या पानांत पाहाणाराचें तोंड उलटें दिसतें. या तलवारीसारखीच हुबेहूब जहाजी तलवार असते. या दोन्ही वजनांत फार हलक्या असतात.

अब्बासी अलेमान, अलेमान जहाजी, अलेमान पट्टणी आणि अलेमान तुर्की अशा अलेमानच्या चार जाती आहेत. अलेमान पट्टणी या गुजराथेंतील पट्टण शहरीं तयार होत असत. हें बडोदें राज्यांतील फार इतिहासप्रसिद्ध शहर आहे.

वरील तलवारी फारच मौल्यवान् आहेत.

( चित्र नं. २ )

## अलेमान निमचा तलवार

या लहान तलवारीचें पान अलेमान जव्हेरदार असून पोलाद चंद्रवट जातीचें आहे. ही तलवार श्रीमंत युवराज फत्तेसिंहजी दरबारांत व स्वारींत वापरतात. मुठीवर सोन्याच्या जडावाचें काम केलेलें असून तिला परज आहे. मुठीचा घाट दिल्लीशाई आहे. म्यान भरगचीचें आहे. नक्की व कबजा सोन्याचा असून त्यावर हिरे माणिक बसविले आहेत. मुठीसह तलवारीची लांबी २६॥" असून रुंदी १" आहे. सर्व तलवारीची किंमत रु. २,५५२ दोन हजार पांचशें बावन आहे. म्यान व मूठ यांवर २२ हिरे, ८८ माणिक व ८६ पाचू बसविले आहेत.

( चित्र नं. ३ )

## ऊनाशाई

ही ऊनाशाई तलवार वांकडी आहे. हिचें पोलाद रामपुरी आणि खेडी यांचें मिश्रण आहे. एक पान रामपुरी व एक पान खेडी या मिश्रणानें ही तलवार तयार झालेली आहे. ही तलवार माळवा प्रांतांत ऊना गांवीं होत अस-

त्यानें हिला ऊनाशाई म्हणतात. हिची मूठ मुल्हेरी आहे. हिला परज असून त्याला गादी आहे. पुतळा बारीक असल्यानें गादी चढविली आहे. घामानें हात सरकूं नये म्हणून तांब्याची तार पुतळ्यांत म्हणजे मुठींत बसविलेली आहे. ही तलवार अत्यंत जुनी असून पुष्कळ युद्धांत तिनें काम केलें असल्याचें दिसतें.

( चित्र नं. ४ )

## कत्ती

कत्तीच्या अनेक जाती आहेत. रामपुरी कत्ती, दिल्लीशाई कत्ती, चिमटेदार कत्ती, हकीमखानी कत्ती, नवाजखानी कत्ती आणि हुसेनी कत्ती. महाराजांचे संग्रहीं या सर्व जाती आहेत. यांच्या मुठी निरनिराळ्या प्रकारच्या आहेत. त्यांचें वर्णन रजिष्टरांत लिहिलें आहे.

( चित्र नं. ५ )

## करवती मगरी

ही तलवार फरासी पोलादाची बनविलेली आहे. धारेच्या बाजूस करवती-प्रमाणें दांते आहेत. पातीस मगरीच्या पाठीप्रमाणें खवलें आहेत. ही तलवार टोंकापासून १०″ पर्यंत चिरलेली आहे. पात साधारण बांकदार आहे. या तलवारीचे वार फार भयंकर स्वरूपाचे होतात. सुमारें ५०० वर्षांपूर्वीची ही तलवार असावी असा अंदाज आहे. मूठ दिल्लीशाई असून निकल-प्लेटेड आहे. मुठीसह हिची लांबी ३७॥″ आहे. मुठीजवळ रुंदी १½″ असून मध्यावर १।″ आहे. वजन मुठीसह ७५ तोळे आहे.

( चित्र नं. ६ )

## किरच नं. १

तोलेदो जातीच्या पोलादाचें हिचें पान बनविलें आहे. या पानावर नक्षी केली असून खजान्यांत एक खांच आहे. त्यांत कंपनीचा ट्रेडमार्क आहे. हेन्री लुईस कंपनी १७२ न्यू बॉन्ड, लंडन, या कंपनीनें ही तलवार बनविली आहे. या तलवारीचा नंबर ३३,२०० आहे. पानाची लांबी मुठीसह ३८″ असून रुंदी १″ आहे. पानाची किंमत १,००० एक हजार रुपये आहे. मूठ इंग्रजी

पद्धतीची असून सिंहाच्या तोंडाची आहे. मुठीवर सोन्याचें पाणी दिलेलें असून हिरे माणिक बसविले आहेत. कै. श्रीमंत पूज्य सयाजीराव महाराज यांचा मोनोग्राम व ताज या तलवारीवर आहेत. हिचें म्यान धातूचें असून त्यावर सोन्याचा मुलामा दिलेला आहे. वरच्या बाजूस नक्षीकाम केलेलें असून त्यांत हिरे बसविले आहेत. पट्टा अडकविण्याकरितां म्यानास कड्या ठेविल्या आहेत. म्यान, मूठ व पान या सर्वांची मिळून किंमत रु. ११,४०८ अकरा हजार चारशें आठ आहे. ही किरच कै. श्रीमंत सयाजीराव महाराज मोठ्या परेडच्या वेळेस वापरीत असत.

( चित्र नं. ७ )

## किरच नं. २

यांचें पानावर नक्षीकाम आहे. ही किरच श्रीमंत कै. पूज्य सयाजीराव महाराज यांना नेक नामदार व्हाईसरॉयसाहेब यांनीं भेट दिली आहे. हेन्री लुईस कंपनी, लंडन, हिनेंच ही बनविली आहे. याचा नंबर २१,४५३ आहे. मुठीसह या तलवारीची लांबी ३८″ असून रुंदी १″ आहे. पानाची किंमत रु. १,००० एक हजार आहे. मूठ इंग्रजी पद्धतीची असून सिंहाच्या तोंडाची आहे. मूठ इमिटेशन हस्तिदंती आहे. तिच्यावर मोनोग्राम व ताज असून त्याचे भोंवतीं २३ मोती बसविले आहेत. म्यान धातूचें नक्षीदार केलेलें असून त्यावर सोन्याचें पाणी दिलेलें आहे. पट्टा अडकविण्यास कड्या केलेल्या आहेत. या संपूर्ण तलवारीची किंमत रु. १,५५२ आहे. केव्हां केव्हां ही किरच श्रीमंत कै. सयाजीराव महाराज वापरीत असत.

( चित्र नं. ८ )

## खांडा

खांडा हें हत्यार फार वजनदार असून त्याच्या अनेक जाती आहेत. उदाहरणार्थ, खांडेराय म्हणजे पृथ्वीराजांचे काका यांचा खांडा, तसेंच शिवाजी महाराजांचा खांडा, खंडेराव महाराजांचा खांडा, जसवंती खांडा हे खांडे प्रसिद्ध आहेत. पूर्वी रजपुतांत दुसरी बायको करावयाची म्हणजे स्वतः नवरदेव लग्नास जात नसे. पण त्याचा खांडा पालखींतून जात असे. मुलगी त्या खांड्यास हार

'निराशा शूराच्या कधिही हृदया स्पर्श न करी'



एतावानेव पुरुषः यदमर्षी यदक्षमी ।
क्षमावान् निरमर्षश्च नैव स्त्री न स पुनः पुमान् ॥

—महाभारत—

भावार्थः—अन्यायाची चीड या संताप येत नाहीं तो पुरुष कसला ?

घालीत असे. खांडा हें सरळ हत्यार आहे. याला चिमटा लावलेला असतो. याचा पिपळा रुंद असतो. याची मूठ ओढेदार, मोगरा लांब, नक्षे खिळे मारून पानास जोडलेले आणि पिपळा दुधारी असतो. पोलाद चंद्रवट जव्हेरदार. श्रीमंतांचें शस्त्रागारांत असे खांडे पुष्कळ आहेत. त्या प्रत्येकांत कांहींतरी नावीन्य आहे. त्यांपैकीं एकाच खांड्याचें चित्र देण्यांत आलें आहे. त्याची मूठ मुल्हेरी आहे.

( चित्र नं. ९ )

## खुरासानी

खुरासानी तलवारीचें पोलाद उत्तम असून त्याची जात दमास्कस आहे. ही तलवार खातेदार आहे. तुर्कस्थान व इराणकडे अशा जव्हेराला चमनबंदी म्हणतात. याला नळ नाहींत. ही तलवार थोडी वांकडी आहे. हिचें नोंकाजवळचा पिपळा एकधारी आहे. इराणांत खुरेसान नांवाचा एक प्रांत आहे. त्या ठिकाणीं या तलवारी होतात. त्यामुळेंच या तलवारीस खुरासानी नांव मिळालें आहे. या जातीच्या तलवारी फार महाग असतात. या तलवारीची किंमत रु. ४,००० चार हजार आहे. हिची मूठ सोजित्रा येथील आहे. मूठ नक्कर चांदीची आहे. या तलवारीवर " सुलतान फत्तेअल्ली मुलकन शीर खान " अशीं अक्षेरें पार्शियन भाषेंत लिहिलेलीं आहेत.

( चित्र नं. १० )

## गद्दारा

हा गद्दारा इतर तलवारींपेक्षां निराळ्या आकाराचा आहे. याचा खजाना पट्टी दिल्यासारखा दिसतो. याचें पानावर एक मोठा नळ पिपळ्यापर्यंत असून पिपळा दोन धारी आहे. या पिपळ्यांत दोन नोंका दिसतात. खालचा भाग पसरट आहे. यावर खजान्यापासून गंगाजमनी सोन्यारुप्याच्या तारेचें सुबक काम केलेलें आहे. ही तलवार फार मोठी नाहीं; तरीपण तिनें गेंड्यासारखें अवजड जनावर देखील कापलें जातें. या तलवारीनें गद्दरमध्यें म्हणजेच लढाईंत उत्तम काम केलें असल्यानें हिचें नांव गद्दारा पडलें आहे. गार्दी लोक ही तलवार

वापरीत असत. हिची मूठ दिल्लीशाई असून हिच्यावर चांदीचें नक्षीदार काम केलेलें आहे.

( चित्र नं. ११ )

## चतुर्भुजी तलवार

या तलवारीवर लहान मोठे अकरा नळ आहेत. देवींचीं चार चित्रें आहेत. देवी चतुर्भुजा आहे. देवीच्या एका हातांत त्रिशूळ, दुसऱ्या हातांत खंजीर, तिसऱ्या हातांत तलवार व चौथ्या हातांत खंजीर आहे. दोन्ही खजान्यावर वाघाचीं चित्रें आहेत. पान रुंद आहे. पिपळ्यावर उभ्या देवींचें चित्र दोन्ही बाजूस कोरलेलें आहे. पिपळा दुधारी आहे. पोलाद हत्तिपगी आहे. मूठ उदेपुरी असून तिच्यावर सोन्याच्या तारेचें काम केलेलें आहे. म्यान मखमलीचें आहे. तेनाल व मोनाल जाळीदार असून उदेपुरी आहेत. या तलवारीची किंमत रु. ५०० आहे.

( चित्र नं. १२ )

## जफरतकिया

ही तलवार निमच्याप्रमाणें लहान आहे. दिल्लीपति बादशहा अबुजफर यांनीं ही तलवार आपल्या उशीखालीं ठेवण्याकरितां मुद्दाम तयार करविली होती. या तलवारीस पाठींत एक खांच मोठी दिली असल्यानें ही तलवार (पेट्यांत) मध्याला अरुंद झाली आहे. ही खांच उशीखालीं ठेवण्याकरितां केली असावी असें दिसतें. हिचें पोलाद हत्तिपगी आहे. कारागिरानें चौकट्या सर्व तलवारभर पाडल्या आहेत. ही तलवार नमुनेदार आहे. मूठ औरंगजेबी परजवांचूनची आहे. मुठीवर गंगाजमनी काम फार छान केलें आहे.

( चित्र नं. १३ )

## जनुबी

या तलवारीच्या खजान्यांत आडवे सहा पट्टे असून बारीक उभे नळ पावणेतीन आहेत. हिचें पोलाद फरासी आहे. पिपळा दोन धारेचा असून ही तलवार साधारण बांकटी आहे. फारसी भाषेंत जनूब दक्षिण दिशेस म्हणतात.

त्या दिशेला ही तलवार तयार केली आहे. मूठ जोधपुरी आहे. ही तलवार पुरातन काळची आहे.

( चित्र नं. १४ )

## जव्हेरदार इराणी गोलिया

या तलवारीची किंमत रु. ७,००० सात हजार आहे. पोलाद दमास्कस चमनबंदी आहे. मूठ सिंधी असून तिच्यावर सोन्याच्या तारेचें काम केलेलें आहे. म्यान मखमलीचें आहे. नक्षी चांदीची आहे. तलवारीवर उर्दूमध्यें खालीलप्रमाणें लिहिलें आहे:—

" तहशील अबुवक्र हरमुदीद उम्रबह अबुमुरीद खिरदमुंद
उस्मान बहेदार चाहरम अलीशाह दुलदुल सवार. "

" अब्बासी मिया खानकार खुदियार नसर जहां सरकार
खान ७,०००. "

खजान्यांत एका बाजूस मगरीचें चित्र आहे. दुसऱ्या बाजूस कोणत्या तरी जनावराचें चित्र असून खजान्याचे वर दोन चिमण्या चोंचीला चोंच लावून बसलेल्या दिसतात. ही तलवार अत्यंत जुनी म्हणजे १,२०० वर्षांपूर्वीची असावी, असें तिच्या पोलादावरून आढळून आलें आहे. ही तलवार शकुनी आहे.

( चित्र नं. १५ )

## जुनी गुजरात

या तलवारीचें पोलाद फरासी आहे. हिच्यावर त्रिशूळ आहे. नळ पावणेतीन म्हणजे पिपळ्यापर्यंत एक नळ असून दुसरे दोन टोंकापर्यंत आहेत. हिची मूठ हकीमखानी असून हिच्यावर गांजा आहे. पिपळा दुधारी आहे. ही गुजराथची जुनी बनावट आहे. ही चांपानेरच्या पाण्यानें तयार केली असावी असें कित्येक जण म्हणतात. या म्हणण्याला आधार म्हणजे तिच्यावर पावागडच्या देवीच्या त्रिशूळाचा छाप आहे.

( चित्र नं. १६ )

## जुल्फुकार ( दुद्दा ) समशेर

ही जोड तलवार आहे. म्हणजे एका म्यानांत दोन तलवारी अशी हिची प्रत्यक्ष स्थिति आहे. हिची मूठ अरबी घाटाची आहे. फिरंग हा खेळ खेळण्याच्या उपयोगी पडणारी ही तलवारीची दुकल आहे. ही दुकल ४०० वर्षांपूर्वीची आहे असें वाटतें. अशा प्रकारच्या तलवारी पालनपूर स्टेटमध्यें पाहण्यांत येतात. वडोद्यांतील नबावजादे मीर मोयुद्दीन सद्रुद्दीन खानसाहेब यांनीं महाराजसाहेबांचे सेवेशीं अत्यंत प्रेमादरानें ही तलवार भेट दिली असल्याचें समजतें. पानें फरासी पोलादाचीं आहेत. पानांमध्यें दोन ठेंचा व मुठीमध्यें एक मिळून तीन एकमेकांत बरोबर बसतात. दुमाले चप्पट आहेत. मूठ, तेनाल व मोनाल यांवर सोन्याच्या वर्खाचें काम केलेलें आहे. गल्तनीसाठीं एक भोंक ठेवण्यांत आलें असून म्यान हिरव्या मखमलीचें आहे.

( चित्र नं. १७ )

## तिराघाटी सुरा

हे सुरे श्री प्रतापशस्त्रागारांत पुष्कळ आहेत. त्यापैकीं एकाचें चित्र येथें दिलें आहे. याचें पोलाद फरासी आहे. हा सुरा निमूळता असून याच्यांत नळ आहेत. असे कित्येक सुरे नळाचांचूनहि आढळतात. पिपळा एकधारी आहे. खजान्यांत मनोरा असून उर्दू लिपींत कांहीं अक्षरें अस्पष्ट आहेत. मूठ लाकडी आहे. हे सुरे तिरा नांवाच्या प्रांतांत तयार झाले आहेत. या प्रांतावर इंग्रजांनीं स्वारी केली त्यावेळीं असले सुरे पुष्कळ मिळाले. अशा सुऱ्यांची नक्कल पालनपुरांतहि दिसते. मकराणी लोक असले सुरे फार वापरतात. त्यांचे मुलुखांतहि या सुऱ्याची बनावट केलेली पाहाण्यास मिळते. खोंच मारण्यास या सुऱ्याचा फार उपयोग होतो. मकराणी सुरे थोडे रुंद असतात. कित्येक सुऱ्यांवर जव्हेर अगर अभ्रहि आढळून येतें.

( चित्र नं. १८ )

---

भागे मत तूं कंथडा ।
तुज भागें में खोड़ ॥
मेरी सराकी सोहळिया ।
ताली दे मुख मोड़ ॥ १ ॥



उत्तरा, उत्तरा शुं करे ? सांभळ मारी मात;
रणमां ज्यारे घा पडे, त्यारे उत्तरा दे नहीं हाथ.




चित्र नं. १९, २३

पान ३७, ३८




चित्र नं. २०

## तुर्की चमनबंदी तलवार

या तलवारीची किंमत रु. ४,००० चार हजार आहे. मूठ दिलीशाई असून चांदीची आहे. पानाचें पोलाद मोमिया जातीचें असून चमनबंदी आहे. म्यान भरगचीचें असून नवें आहे. खजान्याचे पुढें उर्दूमध्यें

" सीद्दीक अकबर अमीर उमर मीर उस्मान

खरीददारः—मीर अकरमखान

बनवणारः—महंमद काजी

किंमत ४००० "

असें लिहिलें आहे. ही तलवार तुर्कस्तानकडील आहे.

( चित्र नं. १९ )

## तेगा

तेगा हें ल्हान हत्यार आहे. तेगपासून तेगा हें नांव उत्पन्न झालें. हा तेगा अडीअडचणीच्या ल्हान जागेंत पूर्वीचे लोक वापरीत असत. सिरोही येथें असले तेगे अद्यापिही होतात. शीख लोक यास किरपाण म्हणतात. याची मूठ औरंगजेबी आहे.

( चित्र नं. २० )

## दशावतारी तलवार

या तलवारीचें पोलाद फरासी जातीचें आहे. पात्याच्या एका बाजूस दाही अवतारांचीं चित्रें आहेत व दुसऱ्या बाजूस त्यांचे प्रतिस्पर्धी यांचीं चित्रें आहेत. तलवार साधारण बांकदार आहे. खजान्यापेक्षां तलवारीचा मध्यभाग जास्त रुंद आहे. हिची मूठ रामपुरी जातीची आहे. तिच्यावर चांदीच्या तारेचें काम केलेलें आहे. हिची लांबी ३४॥" असून रुंदी १⅔" आहे. वजन ७४ तोळे आहे.

( चित्र नं. २१ )

## नागन

नागन नांवाच्या तलवारी महाराजांच्या संग्रहांत हल्लीं दोन आहेत. या वांकड्या नाहींत, सरळ आहेत. एकीला अकीकची मूठ असून दुसरीला घोड्याच्या तोंडाची मूठ आहे. या अकीकच्या मुठीची किंमत रु. ५०० पांचशें होईल. अकीकची मूठ सुंदर, चेहरेदार व सुबक बनविली आहे. हिचें पोलाद फरासी जातीचें आहे. हिला नागन म्हणण्याचें कारण असें कीं, ही नागासारखी वांकडी आहे. इराणचें जें निशाण आहे त्याच्यावर अशाच प्रकारचें चित्र काढलेलें आहे. इराणांत ज्या तलवारी होतात त्यावर चमनबंदी जव्हेर असतें. अशा वांकड्या तलवारीला वरचकची मूठ बसवितात. पूर्वी इराणची राजधानी इसपहान येथें या तलवारी बनवित असत.

चित्रांत दाखविलेली ही तिसरी तलवार असून श्रीमंत कै. सयाजीराव महाराजांनीं मानकरी मिया मोसम यांस ती बक्षीस दिल्याचें समजतें.

( चित्र नं. २२ )

## निमचा

ही तलवार पिहानी घाटाची असून हिच्यावर पिहानीचा छाप आहे. उत्तर हिंदुस्थानांत पिहानी नांवाचें शहर आहे तेथें पूर्वी तलवारी होत असत. ही तलवार अर्धी असल्यामुळेंच निमचा हें नांव हिला पडलें आहे. हिचें पोलाद खेडी व रामपुरी जातीचें आहे. हिला बांक थोडा असून हिची मूठ दिल्लीशाई आहे.

अशा ल्हान तलवारी पूर्वी मोठे लोक नेहमीं उठतां, बसतां, जेवतां, निजतां आपल्याजवळ ठेवीत असत. कारण तो वेळ मोठ्या आणीबाणीचा होता.

( चित्र नं. २३ )

## पालनपुरी

पालनपुर नांवाचें स्टेट अबूजवळ आहे. पालनपुरांत पूर्वी फार चांगले कारागीर होते. पालनपुरी तलवांरी महाराजांचे संग्रहांत बऱ्याच आहेत. त्यांत जव्हेर नाहीं. या फरासी पोलादाच्या आहेत. या तलवारींत बारीक नळ असतात.

जोड तलवारी सुद्धां या राज्यांत पूर्वी करीत असत. अलीकडे अशा प्रकारचे कारागीर सांपडत नाहींत. तरीपण आजही त्या स्टेटमध्यें तलवारी बनवितात. नबाब शेर महंमदखानसाहेब यांना तलवारी वापरण्याचा नाद फार असे. त्यांचे पदरीं चांगले चांगले कारागीर होते. या तलवारीची मूठ वरचकची असून पिपळा रुंद आहे.

( चित्र नं. २४ )

## पंचकला

हें हत्यार निरनिराळ्या पांच हत्यारांचें बनलेलें आहे. गुरज, गुप्ती, बंदुक, ढाल व संगीन अशीं यांत पांच हत्यारें समाविष्ट आहेत. हें शस्त्र आसामचे राजे रत्नराज यांनीं संवत् १७१२ विक्रम अगहन मार्गशीर्ष शु. तृतियेच्या दिवशीं गुरु गोविंदसिंह यांसी अत्यंत प्रेमभावानें समर्पण केलें. हाताचें रक्षण करण्यासाठीं यास ढाल आहे लांब पल्ल्यावरील शत्रूस मारण्यासाठीं यास गुरजाचे दांड्यांत बंदुकीची व्यवस्था करण्यांत आली आहे. शत्रू फारच जवळ असल्यास त्याला भोंसकून मारतां यावें म्हणून गुरजाचे वरचें टोंकास एक संगीन बसविली आहे. गुरजावर करवतीप्रमाणें दांते आहेत. संगिनीसह पंचकलेची लांबी ४९" आहे. ढाल अस्सल पोलादी असून त्यावर चंद्र, सूर्य दाखविले आहेत. ढालीचा व्यास ८।" आहे. बंदुकीच्या नळीची लांबी २३" आहे. गुप्ती मुठीसह १२" आहे. संगिनीची लांबी २०॥" आहे. रुंदी १" आहे. सर्व पंचकला अस्सल पोलादी आहे. वजन २१७॥ तोळे आहे.

( चित्र नं. २५ )

## बडोदेशाई

बडोदेशाई सकेला नांवाची तलवार कै. पू. श्रीमंत खंडेराव महाराजांनीं तयार करविली. हिचें पोलाद उत्तम असून हिच्यावर अभ्र आहे. हें अभ्र खातेदार असून या तलवारीला खारीवाव विहिरीचें पाणी पाजलेलें आहे. ही विहीर पूर्वी सूर्यनारायण मंदिराजवळ होती. ती आतां बुजवून टाकली आहे. कै. श्रीमंत खंडेराव महाराज यांनीं प्रथम फौजी कवायतीचें शिक्षण देण्यास सुरवात केली व पायदळ

फौज उभी केली; आणि त्यावेळीं हें हत्यार बनविलें. या तलवारीची किंमत रु. ७०० सातशें आहे. मूठ दिल्लीशाई परंतु परज फिरचघाटी मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें आहे. या मुठीनें हाताचा बचाव चांगला होतो. घाट चांगला आहे.

( चित्र नं. २६ )

## भुजी गोलिया

या तलवारीचें पोलाद फरासी आहे. हिचें पान निमुळतें, पिपळा एकधारी, पातें अरुंद, व खजान्यावर भुजी गोल नक्षीदार काम आहे. तलवार थोडी बांकडी आहे. ही तलवार काठेवाडांतील भूजमध्यें बनविल्यामुळें हिचें नांव भूजी गोलिया असें पडलें आहे. मूठ हकीमखानी असून हिला परज आहे. मार देण्यासाठीं गांजा आहे. या गांजावर कित्येकजण नोंक चौधारी लावतात.

( चित्र नं. २७ )

## मगरबी अथवा मुग्राब

मगरबी अथवा मुग्राब तलवार आपल्याकडील नसून युरोपमध्यें जीं मुसलमानी राज्यें आहेत तिकडीलच असावी. या तलवारीची भट्टी मगरेब म्हणजे संध्याकाळच्या वेळीं लावलेली असावी, अथवा भट्ट्या संध्याकाळीं संपल्या असतील. कांहीं म्हणतात कीं, मिसर देशाचे पश्चिमेस अनेक मुसलमानी राज्यें आहेत; यापैकीं मोरोक्कोचे राजे मगरबच आहेत. त्यांनीं कदाचित् ही तलवार तयार केली असावी. म्हणूनच हिचें नांव मगरबी असें पडलें असावें. या तलवारीचें पोलाद फरासी असून बारीक नळ पावणेतीन आहेत. खजान्याखालीं दोन चंद्र आहेत. हें चिन्ह पण मुसलमानी आहे. मूठ कर्नाटकी आहे.

( चित्र नं. २८ )

## रूमी सुरा

हा सुरा सोसनसारखा असतो. परंतु पुढें रुंद होत जातो. याचा पिपळा एकधारीच असतो. पानावर रूमी छाप आहे. पोलाद खेडी व रामपुरी जातीचें आहे. यावर अंत्रे असतात. याची मूठ दिल्लीशाई आहे. तिला परज आह. याचें जव्हेर मोठें आहे. याची धार आंतल्या बाजूस असते.

( चित्र नं. २९ )

" शस्त्र हीन सिंह भेड़ समान्ना।
सींग दाँत नहिं सूम चलान्ना ॥
रण जूझत न भाजत जान्ना।
शस्त्र हीन नहिं दरस दिखान्ना ॥

–श्री. गुरु गोविन्दसिंह–



ज्याचें हत्यार प्रभावी, त्यापुढें जगाची मान वाकावी.



चित्र नं. २१, २२

पान ३७, ३८

## लालूवाड

हिचें पोलाद फरासी आहे. ही तलवार पट्टणी म्हटली जाते. कडी प्रांतांत पाटण नांवाचें जें गायकवाडांचें राज्यांतील शहर आहे तेथें ही बनविलेली आहे. कारागिरानें हिच्या खजान्याखालीं : [illegible] :· असें चिन्ह केलें आहे. तलवार थोडी वांकडी आहे. मूठ हकीमखानी आहे.

( चित्र नं. ३० )

## शिकारी तलवार

या तलवारीचें पोलाद फरासी आहे. पानावर सोन्याच्या तारेचें काम केलेलें असून निरनिराळ्या शिकारी जनावरांचीं चित्रें सोन्याच्या तारेनें दाखविलीं आहेत. यास्तव अर्धा तोळा, सोन्याची तार वापरली गेली असली पाहिजे. मजुरी वगैरे सर्व मिळून या तलवारीची किंमत अंदाजीं रु. ३०० तीनशें होईल. मूठ उदेपुरी असून म्यान मखमलीचें आहे. फीत खातेदार बसविली आहे. तेनाल व मोनाल जाळीदार तांब्याच्या धातूचें असून वर सोन्याचा मुलामा दिलेला आहे. मुठीवरील सोन्याच्या तारेचें काम उदेपुरी घाटाचें आहे.

( चित्र नं. ३१ )

## सिरोही पत्ताशाई

या तलवारीस मध्यावर एक नळ आहे. हा नळ खजान्याला लागून नसतो. खालील टोंक पिपळ्यापासून दोन धारीचें आहे. या तलवारीस थोडासा बांक आहे. हिची मूठ जोधपुरी आहे. ही तलवार सिरोही सरदार पत्तासिंग यांनीं बनविली आहे. यामुळें या तलवारीचें नांव पत्ताशाई पडलें आहे. या तलवारींत बारीक जव्हेर आहे.

( चित्र नं. ३२ )

## सिरोही मानाशाई

या जातीच्या तलवारीच्या पानावर नळ नसवात. सिरोही नांवाचें संस्थान आबूजवळ आहे. तेथील राजे मानसिंग यांनीं या जातीची तलवार आपल्या संस्थानांतील कारागिराजवळून तयार करविली. तलवारीचें पोलाद रामपुरचें असून

जव्हेरदार आहे. या तलवारीवर दोन माळा आहेत. या माळा अत्यंत शुभ मानल्या जातात. या तलवारीस पट्टे असून पिपळ्यास एका बाजूस धार आहे. तलवारीस धार मसुरी आहे. तलवारीच्या मुठीचा घाट जोधपुरी आहे. ही तलवार दोन पानांची आहे. एक पान- सिरोही असून दुसरें रामपुरी असल्यानें पाठीवर भेग दिसते.

( चित्र नं. ३३ )

## कै. श्रीमंत खंडेराव महाराज यांचा अभ्रदार सकेला

या सकेल्याचें पोलाद चंद्रवट असून सफेद अभ्र खातेदार आहे. पू. श्रीमंत खंडेराव महाराजांनीं बडोद्यांतच हा तयार केला. त्यावर खजान्याखालीं श्रीमंत खंडेराव महाराज यांचें नांव सुबक इंग्रजी अक्षरांत लिहिलें आहे. तें सोनेरी आहे. या तलवारीची लांबी मुठीसह ३६$\frac{3}{2}$" असून रुंदी १।" आहे. वजन १०१॥। तोळे आहे. फक्त पानाचीच किंमत रु. २,००० दोन हजार आहे. मूठ परजवाली असून किरचघाटी आहे. ती मोराच्या पिसाऱ्यासारखी असून कटोरी दिल्लीशाईप्रमाणें आहे. सर्व मूठ चांदीची असून तिच्यावर सोन्याचा वर्ख चढविला आहे. ही मूठ बडोद्यासच तयार झाली आहे. हिच्यावर ४६५ बारीक हिरे व १० माणिक बसविले आहेत. शिवाय १६ पाचूही आहेत. मुठीच्या जडावाचें काम देखील बडोद्यासच झालेलें आहे.

( चित्र नं. ३४ )

## सोसनपत्ता

याचें पातें पोलादी असून त्यावर जेहरी पाणी दिलें आहे. याची लांबी दोन फूट व रुंदी एक इंच आहे. हें टोंकाशीं बारीक परंतु बांकलेलें आहे. यास एकाच बाजूनें संपूर्ण धार असून तें दिल्लीशाई मुठींत बसविलें आहे. ही मूठ हस्तिदंती आहे. हा सोसनपत्ता ल्हान आहे. या हत्यारास अर्ध-तलवार म्हणण्यास हरकत नाहीं. चाबकाप्रमाणें लवचीक व हलकी असल्यानें या तलवारीचे हात करीत असतां थकवा येत नाहीं. हिच्या पाठीस मजबुतीकरितां चिमटा बसविला आहे.

( चित्र नं. ३५ )

## हलबी

हलबी तलवार सुलतान रूमचा जो मुलूख आहे त्या ठिकाणीं हलब नांवाचें एक शहर आहे. त्यास इंग्रजींत अलेप्पो असें म्हणतात. त्या ठिकाणीं ही तलवार तयार केली आहे. हिला लांब दोन नळ आहेत. पोलाद फरासी असून मूठ बंगला घाटाची परजवाली आहे. गळ्यांत लांब कंठी आहे.

( चित्र नं. ३६ )

## हुसेनी

हुसेनी नांवाची तलवार व हुसेनी नांवाची कत्ती असे दोन प्रकार श्री प्रतापशस्त्रागारांत आहेत. हुसेनी तलवार वांकडी आहे. तिच्या पाठीजवळ तसू-तसूवर भोंकाचे चंद्र बनविले आहेत. या भोंकांतून सोनें, पितळ व कोठें कोठें तांबें भरण्यांत येतें. यांच्यामध्यें पितळच भरलेलें आहे. पानावर एक मोठा नळ असून पाठीकडे बारीक बारीक नळांचा देखावा केलेला आहे. अर्थात् हे ठिपके अर्ध–चंद्र आहेत. याला सरनमाई असेंही म्हणतात. हे ठिपके प्रत्येक ठिकाणीं सहा सहा आहेत. पिपळा एकधारी असून मूठ दिल्लीशाई आहे. या तलवारीच्या संबंधानें असें म्हणतात कीं, महंमद पैगंबरसाहेबांचे नातू हुसेनअली यांनीं ही तलवार प्रथम उपयोगांत आणली. म्हणून या तलवारीचें नांव हुसेनी असें पडलें. केव्हां केव्हां ते हुसेनी कत्ती बांधीत असत. त्या कत्तीचे ठोले मोठे नकशीदार बनविले असून ठोल्यांची नकशी पूरबकडची आहे. नख्खा लांब असून मूठ नवाजखानी आहे. हिचें पोलाद रामपुरी जातीचें आहे.

( चित्र नं. ३७ )

## गुरज

**गुरज म्हणजे गदा.** मुसलमान लोक ज्याला गुरज म्हणतात त्यालाच भरत खंडांतील लोक गदा म्हणत असत. गदा या फार वजनी असत. त्या काळचे लोक शक्तिशाली असल्यामुळें ते वजनी वस्तू पसंत करीत असत. चित्रांत

दाखविलेला **गुरज ४०० वर्षांपूर्वींचा असावा.** याला मूठ असून मुठीला परज आहे. मार मारण्याचा गुरज अष्टपैलू असून त्याला मोगरा आहे. श्री प्रताप-शस्त्रागारांत हा गुरज आहे.

( चित्र नं. ३८ )

## माडू

मारचा अपभ्रंश माडू असा झाल्याचें दिसतें. ज्या वेळेस भारत देशांत लोखंडाचा शोध लागला नव्हता त्या वेळेस दगड, बांस, लांकूड आणि जनावरांचीं शिंगें यांचा उपयोग युद्धांत करीत असत. हें वरील हत्यार हरणाच्या शिंगाचें असून त्यावर पोलादाची ढाल बसविली आहे. शिंगाच्या अणकुचीवर पोलादाचें भाले बसविलेले आहेत. हाताचा बचाव होण्याकरितां ढाल आहे. या माडूचे अनेक हात आहेत. हे खेळण्याकरितां नाना प्रकारचे पवित्रे घेतले जातात. हातघाईमध्यें असल्या हत्यारांचा उपयोग पूर्वीं जास्त होत असे. हल्लीं कित्येक ठिकाणीं या हत्यारांचा उपयोग जुन्या तालमींतून होत असतो.

( चित्र नं. ३९ )

## देवी कवच

देवी कवच ही तलवार सन १८४७ च्या वेळची म्हणजे कै. दुसरे सयाजीराव महाराजांच्या वेळची असल्याचें जवाहीरखान्यांतील कागदपत्रावरून समजतें. त्या तलवारीचा काळ संवत् १८०३ चा आहे. हिचें पोलाद हत्तीपगी असून हिच्या मुठीवर **सोन्याच्या अक्षरानें " देवी कवच "** असें लिहीलें आहे. हीं अक्षरें अत्यंत वळणदार असून चांगल्या प्रकारें वांचतां येतात.

हिची मूठ ओढेदार असून मुठीची जात औरंगजेबी आहे. पानावर रामपुरी जव्हेर आहे. दुसरे सयाजीराव महाराज पू. बोलाईचे भक्त होते. ते देवी कवचाचें पारायण करीत असत. म्हणूनच त्यांनीं उत्तम तलवारीचें पान घेऊन त्या पानाला मोठ्यांत मोठी मूठ बसवून त्यावर देवी कवच अशीं अक्षरें लिहून घेतलीं आहेत.

( चित्र नं. ४० )

मुहूर्तं ज्वलितं श्रेयः नच धूमायितं चिरम् ॥

भावार्थः-सतत नुस्तें धुमसत रहाण्यापेक्षां क्षणभर कां होईना स्वतेजानें जगाला दिपव.



उठ कँथ हथियार ले,<br>
मैं लेऊं शङ्कर घो।<br>
पाहुणारा तो भुजवल,<br>
रण वेरी तो तुज ॥ १ ॥

-हाडाराणी-

## सिरोही लाखाशाई

लखराज नांवाच्या सरदारांनीं ही तलवार निर्माण केली आहे. या तलवारीवर **कलमी माळा आहे.** कलमी माळा म्हणजे अक्षरें उत्तम येण्याकरितां ज्याप्रमाणें लेखणी तिरपी कापतात त्याप्रमाणें तिरपी असणारी (/) रेघ हिलाच कलमी माळा म्हणतात. ही तलवार अत्यंत शुभ गणली जाते. लखराजाचें देसल नांवाचें गांव काठेवाडांत होतें असें म्हणतात. त्यामुळें या तलवारीला काठेवाडांत देसल सराई म्हणण्याचा रिवाज आहे. ही तलवार मौल्यवान् समजली जाते. कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, ही तलवार सिरोही संस्थानांत झाली आहे.

या तलवारीची मूठ गार्दी असून मुठीवर ओढा आहे. मुठीवर चांदीचें गिलेट केलेलें आहे. या तलवारीची लांबी ३५½″ असून रुंदी १¾″ आहे. हिचें वजन १०८॥ तोळे आहे.

( चित्र नं. ४१ )

## सिलोनी तलवारी

या दोन तलवारी श्रीमंत महाराजसाहेबांनीं सिलोनचें पहिल्या स्वारींत खरीद केलेल्या आहेत. प्रत्येक तलवारीचें म्यान चांदीचें असून तीन सांध्याचें बनविलेलें आहे. यांच्या मुठी वाघाच्या तोंडाच्या असून परजवाल्या आहेत. एका मुठीवरील वाघाच्या डोळ्यांतील माणिक पडून गेले असून दुसऱ्या मुठीवरील वाघाच्या डोळयांत दोन माणिक आहेत. यापैकीं एका तलवारीचें वजन ५८॥ तोळे असून दुसरीचें वजन ५३॥ तोळे आहे. या तलवारी अत्यंत जुन्या काळच्या असल्यानें श्रीमंतांनीं खरीद केल्या आहेत. या तलवारीची यानासह प्रत्येकीं किंमत रु. ९० आहे.

( चित्र नं. ४२)

## कर्नाटकी तलवार अथवा धोप

**पूज्य महाराजा रणजितसिंग** यानें पोर्तुगीज लोकांना आपल्या फौजेमध्यें नोकरींत ठेविलें होतें आणि त्यांच्या करवीं सैनिकांस कवायतीचें ज्ञान दिलें जात होतें. त्यावेळेस फ्रेंच लोकांकडून लांब सरळ तलवारी

मागविण्यांत आल्या असल्याचें इतिहासांत सांपडतें. अशाच प्रकारच्या तलवारी पोर्तुगीज लोकांमध्येंही होत्या.

**पूज्य शिवाजी महाराज यांना पोर्तुगीज लोकांनीं तीन तलवारी भेट दिल्याचा दाखला सांपडतो. त्यापैकीं एक तलवार साताऱ्यांत जलमंदिरमध्यें आहे; व दुसरी तलवार आमचे येथें आहे.** त्या तलवारीवर पोर्तुगीज लिपींत लिखीत मजकूर आहे. तिसरी तलवार कोठेंही आढळत नाहीं.

शिवाजी महाराजांनीं अशा प्रकारच्या तलवारी घोड्यावरून वापरण्याकरितां तयार करविल्या होत्या त्यालाच कर्नाटकी धोप असें म्हणतात.

फ्रेंच आणि पोर्तुगीज लोक अशा तलवारींना सेफ म्हणतात, आपल्या इकडे या तलवारीला धोप म्हणतात. हिची मूठ कर्नाटकी आहे.

## अरबी सुरा

हा सुरा जव्हेरदार असून याचा घाट अरबी आहे. याच्या खजान्यांत नक्षीकाम केलेलें असून पाठ रुंद आहे. मूठ दिल्लीशाई परजवाली आहे. मुठीवर सोन्याच्या तारेचें काम केलेलें आहे. मोगऱ्यांत एक भोंक आहे. या सुऱ्याचें म्यान मखमलीचें आहे.

## अलेमान जहाजी

पान चंद्रवट पोलादाचें बनविलें असून पानाची लांबी ३४॥" व रुंदी १३" आहे. मुठीसह वजन ५६। तोळे असून पानाची किंमत रु. २०० आहे. मुठीला सोन्याचें पाणी दिलेलें असून ती सिंहाच्या तोंडाची आहे. मुठीवर इमिटेशन पिरोजे व माणिक बसविलें आहेत. म्यानाला तीन कबजे केलेले असून नक्षी सोन्याच्या मुलाम्याची आहे. म्यानाला साखळी लाविलेली असून तिच्यावरही इमिटेशन पिरोजे आहेत. म्यान व साखळी यांची किंमत रु. २०० होईल. संपूर्ण तलवारीची किंमत रु. ५०० होईल. ही तलवार पांच सहाशें वर्षांपूर्वीची असावी.

## चमनबंदी तलवार

या तलवारीचें पोलाद दमास्कसी जातीचें असून हिच्यावरील जव्हेर चमनबंदी आहे. या चमनबंदी जव्हेराला हिंदुस्थानांत गटबंदी म्हणण्याचा परिपाठ आहे. या तलवारीचें पान बांकदार असून मूठ वरचकची अरबस्तानी आहे. वरचक सोन्याचें आहे. तिला हस्तीदंती चिपा बसविल्या आहेत. मुठ्यांत सोन्याची तार गुंडाळलेली आहे. मुठीवरील टोपी सोन्याची आहे. ही वजनांत अत्यंत हलकी असून हिची पाठ गोलाकार आहे. या तलवारीची किंमत रु. ७,००० आहे.

## जमधर

जम म्हणजे यम, धर म्हणजे धाड किंवा दाढ, मिळून एकंदर अर्थ यमदाढ. हें हत्यार १′ लांब व १३⁄४″ रुंद असून यांत दोन पोलादी पाती आहेत. अर्थात् दोन्हीही पात्यांना तीक्ष्ण धार आहे. या पात्यांमध्यें पाव इंचाचें अंतर आहे. याची मूठ ५″ आहे. हें हत्यार मुठींत पकडून नंतर मार द्यावयाचा असतो. हा मार पोटांत अगर बरगड्यांत देतां येतो. या योगें आंतडें बाहेर येतें. शिवाजी महाराजांचें व अफजुलखानाचें युद्धांत जमधरचाच उपयोग करण्यांत आला होता. इतिहास संशोधकांनीं जमधाड ही तलवार म्हटली आहे, पण जमधाड ही तलवार नसून हें एक दोन पात्यांचें शस्त्र आहे.

## जंबिया

सदर जंबिया नबाब हाफी जुद्दीनसाहेब यांचेकडून खरीद केलेला आहे. याचें पान सालेमन असून मूठ अकीकची आहे. यावर माणिक १८६ व पाचू ४३ आहेत. हें हत्यार जुनें असल्यानें कांहीं माणिक पडून गेले आहेत. म्यानाला सोन्याची कडी आहे. याचा मिना जांभळा व गुलाबी आहे. लांबी मुठीसुद्धां १४॥″ आहे. पानाची रुंदी मध्यावर २″ आहे. याची किंमत १,२०० बाराशें रुपये आहे. अशीं रत्नजडित हत्यारें महाराजांचे शस्त्रागारांत पुष्कळ आहेत.

## ढाल

ढाल बराखी गेंड्याची अत्यंत नाजुक परंतु मजबूत अशी आहे. तिच्यावर पांच सोन्याचीं फुलें आहेत. तीं बारा तोळ्यांची आहेत. शिवाय पांच माणिक व एक पाचू आहे.

दुसरी अशीच ढाल गेंड्याची आहे. तिच्यावर चार फुलें आहेत व एक चंद्र आहे. फुलावर हिरा बसविला आहे. या शिवाय तिच्यावर १८ हिरे, व ३२ माणिक आहेत. हिची किंमत रु. ७५० आहे.

तिसरी ढाल श्री प्रतापशस्त्रागारांत सूर्यकांत नांवाची चौदाशें वर्षांपूर्वीची आहे. या शिवाय पोलादी ढाली अनेक आहेत. तसेंच गेंड्याच्या ढाली, कासवाच्या पाठीच्या ढाली, सूसच्या ढाली, सिलेटच्या ढाली निरनिराळ्या नमुन्याच्या लहान मोठ्या आहेत.

## तमंचा

तमंचा दोन नळीचा आहे. त्याच्यावर मिन्याचें काम केलेलें आहे. कुंदाच्या बाजूस घड्याळ बसविलें आहे. पिस्तुलावर सोन्याचें काम केलेलें असून वेलबुट्टी काढलेली आहे. त्यावर मोती, हिरेकुरचे, व माणिककुरचे जडविले आहेत. किंमत ५०० रुपये आहे.

## पट्टा

पूर्वी महाराष्ट्रांत पट्ट्याचा खेळ नांवाजलेला होता. संभाजी महाराजांना पट्टापान फार आवडत असे. थेटपांवेतों त्यांनीं युद्धांत पट्टापानच वापरलेलें आढळतें. याची लांबी खांद्यापर्यंत असते. याचीं पानें रामपुरी, व कर्नाटकी असतात. हीं पट्टापानें पट्ट्याचें रूपानें कमरेस बांधतां येतात. महाराजांचें शस्त्रागारांत अनेक पट्टे आहेत. परंतु कै. श्रीमंत खंडेराव महाराज जो पट्टा फिरवीत होते तो अत्यंत चांगला आहे. याचे मुठीला खोचळा म्हणतात. याचें पान सरळ, दुधारी, पन्नास अंगुळे लांब आहे.

मित्रपणें परहितकारी वाड्माधुर्यें परशोकहारी ।
सामर्थ्यपणें वेत्रधारी, पुरुषार्थें जगमित्र ।

–श्री दासबोध–



दण्डेन धार्यते लोकः

–मनुस्मृति–

भावार्थः–प्रजेचें धारण दण्डानें होत असतें.




चित्र नं. २८, २९

## पेशकवज

सुरतेचे नवाब हाफीजुद्दीनसाहेब यांचेकडून मे. शेहर-काजी अहंमद हुसेन यांचेमार्फत हें पेशकवज व वरील जंविया खरीद केला आहे. याचें पान सालेमन जातीचें आहे. याचें म्यान तीन तुकड्यांनीं तयार केलें आहे. हें सर्व सोन्याचें असून त्यावर मिन्याचें काम केलेलें आहे. मूठ सुद्धां सोन्याची असून तिच्यावरही मिन्याचें काम केलेलें आहे. हें जांभळें, पांढरें, पिरोजी, हिरवें अशा रंगांचें आहे. याची लांबी १५॥" व रुंदी १३" आहे. याची किंमत रु. १,३०० तेराशें आहे.

## बांकदार इराणी तलवार

ही तलवार बांकदार असून जव्हेरदार आहे. हिचें पोलाद दमास्कसी आहे. ही तलवार ५०० वर्षांपूर्वी इराणांत झाली आहे. मुठीसह तलवारीची लांबी ३८॥" असून रुंदी १।" आहे. वजन ७६। तोळे आहे. पानाची किंमत ४,००० चार हजार रुपये आहे. तिच्यावर उर्दू भाषेंत

"सरकार मीर कदमअलीखान"

यांचेकरितां महमद काझीम झिरामी सिधेसे अकबर अमीर उमर अमीर उस्मान अली आलेही सलाम यांनीं तयार केली अशा अर्थाचा मजकूर आहे. किंमत "हरीफ ४,०००" असें या तलवारीवरच लिहिलें आहे. हिची मूठ दिल्लीशाई असून तिच्यावर सोन्याचा वर्ख चढविला आहे.

## वाघनखें

श्री शिवाजी महाराजांनीं अफजुलखानापासून बचाव करण्यास्तव वाघ-नखांचा उपयोग केला असें सार्वत्रिक मत आहे. हीं वाघनखें पोलादी पट्टींत पांच इंच अंतरानें बसविलेलीं चार तीक्ष्ण नखें आहेत. प्रत्येक नख सव्वा इंच लांबीचें असून त्यास तिन्ही बाजूंनीं शिरा व खालच्या बाजूस धार आहे. नखें ज्या पट्टींत बसविलीं आहेत त्या पट्टीच्या दोन्हीं बाजूंस आंगठ्या आहेत. हें हत्यार हातांत धरून मुठींत सहज लपवितां येतें. हिच्या ज्या आंगठ्या आहेत त्यावर हिरे माणिक लावल्यास समोरच्या मनुष्यास आंगठ्यांचाच भास होतो.

## सांग

या हत्याराची लांबी ६′–४″ आहे. हें पोलादी असून याला कोठेंच सांधा नाहीं. याचे शेवटाला असलेलें पातें ९″ असून आरंभीं १॥″ रुंद आहे. टोंकाशीं तें निमुळतें होत गेलें आहे. याचा दांडा ५′–७″ असून, दांड्याचा व्यास २″ आहे. श्री शिवाजी महाराजांचे वेळीं या हत्याराचा उपयोग होत असे. खुद्द श्री शिवाजी महाराजांची हें हत्यार वापरणारांची एक खास पायदळाची तुकडी असे.

"एही बाण चौहान, राम रावण उत्यप्यो ।<br>
एही बाण चौहान, करण सिर अर्जुन कप्यो ॥<br>
एही बाण चौहान, शम्भु त्रिपुरासुर संध्यो ।<br>
एही बाण चौहान, भ्रमर लछमन कर बंध्यो ॥<br>
सो बाण आज तो कर चढ्यो, चन्द विरद सच्चो चवै ।<br>
चौहान राज संगर धनी, मत चूकै मोटे तवै ॥<br>
चर वंश चौबीस गज, अंगुल अष्ट प्रमान ।<br>
एते पर सुल्तान है, मत चूकै चौहान ॥"

—चन्द कवि—


दुमाला
खजाना
नळ
नळ
पेटा
पाठ
धार
पीपळा
टोंक
तलवारीचें पान.




मूठ

# तलवार

प्राथमिक विवेचनांत एकंदर शस्त्रविद्येचें थोडक्यांत असें परीक्षण करण्यांत आलें. आतां मुख्य चर्चेचा विषय जी तलवार तिच्याकडे वळूं या.

परीक्षण:

तलवारीचे मुख्य भाग दोन—एक पान व दुसरा मूठ. पहिल्यानें पानाचा विचार करावयाचा म्हणजे पानाचे खालीलप्रमाणें मुख्य भाग पाडतां येतीलः—

तलवार.




सर्व तलवारींच्या पानांतून दुमाला निघतो असें नाहीं. जें पोलाद नरम असतें त्याच्या अंगचा दुमाला निघूं शकतो. कठीण पोलादाच्या पानाला जोड देवून दुमाला तयार करावा लागतो. बहुतेक जव्हेरदार व अभ्रदार तलवारींच्या पानाला जोड दुमाल्यांत असतो. दुमाल्याची लांबी १॥″—२″ असते. याची अणकुची मुठीच्या पोकळ भागांत राहते. प्रथम मुठींत पिंपळाची लाख गरम करून घालून आंतून त्यांत दुमाला बसवून गच्च भरण्यासाठीं सळीनें दाबून दाबून घ्यावें लागतें, तें इतकें कीं, मूठ व पान यांचा एक जीव झाला पाहिजे.

दुमाला.

२. खजाना म्हणजे दुमाला संपल्यानंतरचा भाग. यांतील कांहीं भाग मुठींत जातो, बाकीचा विनधारेचा तलवारीच्या पानाच्या जाडीचा भाग सव्वा इंचाचा असतो. यासच खजाना असें म्हणतात.

खजाना.

३. पेटा म्हणजे तलवारीचा मध्य भाग. हा भाग महत्त्वाचा असतो. याच भागीं उत्तम व कठीण पोलाद वापरतात. बाकीच्या भागांत नरम पोलादही असूं शकतें. कित्येक तलवारी सबंध पोलादाच्या असतात. तलवारीस पाणी द्यावयाचें असतें तें या मध्य भागाला म्हणजेच पेट्याला होय.

पेटा.

४. जोत म्हणजे तलवारीचा बंद होय. ही जोत थोड्याच तलवारीस असते.

५. पिपळा म्हणजे तलवारीचा शेवटचा भाग. कित्येक तलवारींत हा भाग निमुळता असतो तर कित्येकींत तो निराळ्या प्रकारचा असतो. कित्येक पिपळे दुधारी असतात.

पिपळा.

६. नोंक म्हणजे अणकुची अथवा टोंक. नोंक नेहमीं फार तीक्ष्ण करून घेतलेली असते. हिचा उपयोग ऐन प्रसंगीं फार होतो. ब्रिटिश सरकार कीरच नांवाच्या तलवारीस फक्त नोंकच चांगली धारदार काढून घेतात.

नोंक.

७. धार चार पांच प्रकारची काढतात, पण मुख्य असे जे चार प्रकार म्हटले जातात ते खालीलप्रमाणें:—

धार.

| | |
|---|---|
| १. ओपला. | ३. वासलावाढ. |
| २. मसुरी. | ४. राई. |

धारेला वाढ असेंही म्हणतात. धार काढण्यास फार कुशलता लागते. ती तलवारीच्या प्रमाणांत काढण्याची पद्धत आहे. ही धार खजान्यानंतर सुरू करून थेट नोंकपर्यंत नेतात. धार वांकडी तिकडी काढणारा शिकलगीर अडाणी समजावा. पिपळ्याच्या दोन्ही बाजूस धार काढतात; परंतु ही गोष्ट तलवार वापरणाराच्या मर्जीची असते. कांहीं जण एकच बाजूस धार काढून घेतात. ज्या तलवारी दुधारी असतात त्या बहुतकरून सरळ असतात.

पाठ.

८. तलवारीची पाठ करण्याचें काम महत्त्वाचें आहे. मनुष्याच्या कमरेला जें महत्त्व आहे तेंच तलवारीच्या पाठीला आहे म्हटलें तरी चालेल. पाठ चांगली नसेल तर नुसत्या वाराच्या झटक्यानें तलवारी तुटतात. यासाठीं पानाची जोड मोठ्या शिताफीनें करावी लागते. जव्हेरदार आणि अभ्रदार पानास पाठीचा मिलाफ फारच चांगला आणि जाड असा करावा लागतो. पाठींत चिरा असल्या म्हणजे त्यांत जव्हेर किंवा अभ्र निघेल अशी खात्री असते. पाठ जितकी जाड असेल तितकी तलवार चांगली दिसते, मजबूत असते आणि खूप टिकते. पाठीवरून जव्हेर व अभ्र निघेल किंवा नाहीं हें सांगता येतें. जव्हेर व अभ्र असेल तर पाठीवर कानस काम करूं शकत नाहीं. पाठीवर तीं टिकतच नाहीं—सरकून जाते. नरम पोलादावर मात्र कानस चालूं शकते.

## २. मुठीचें वर्णन

मुठीचें महत्त्व व भाग.

कोणाचीही शेंडी हातांत असणें हा वाक्प्रचात शेंडीचें जें महत्त्व दर्शवितो। तेंच महत्त्व तलवारीच्या मुठीस आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण मुठ शिवायची तलवार कितीही उत्तम असली तरी ती उपयोगाचे दृष्टीनें ऐनवेळीं शून्य ठरते.




मोगरा.

१. मुठीच्या वरच्या भागास फुलाच्या कळीसारखा जो आकार केलेला असतो त्याला मोगरा असें म्हणतात. मोगऱ्याला कोठें कोठें भोकही ठेवतात. या भोकांत रेशमी



पश्चिम–उत्तर बाजू



कै. श्रीमंत सयाजीराव महाराज दरबार प्रसंगी वापरीत असलेल्या तलवारी, आणि शिक्के कट्यार, गुप्ती व तमंचा पट्ट्याच्यासहित

परज.

८. परज म्हणजे पाटी आणि ठोल्यास जोडलेला भाग. याला कांहीं ठिकाणीं ओढा व कांहीं ठिकाणीं बिनी असेंही म्हणतात. याचा उपयोग फारच मोठा म्हणजे तलवार वापरणाराच्या हाताचा बचाव हा होय. परजेमुळें हाताच्या हातकट्टया लागत नाहींत. परज नसलेली तलवार युद्धप्रसंगीं वापरणें जोखमीचें समजत. अलीकडे अशाच मोकळ्या मुठी लोक पसंत करतात.

कंगणी.

९. मोगऱ्याच्या खालीं कंगणी तयार करतात. यामुळें मुठीच्या शोभेंत भर पडते.

कंठी.

१०. कंठी ही मुठीच्या गळ्यांत असते. हिलाच कंठी असें म्हणतात.

जनोई.

११. जनोई म्हणजे जानवें. हें जानवें हिंदु लोक आपल्या तलवारीच्या मुठीवर तयार करून घेत असत.

मुठीचे प्रकार.

निरनिराळ्या देशींच्या कारागिरांनीं आपआपल्या समजुतीप्रमाणें तलवारीच्या पानास शोभा देतील अशा अनेक प्रकारच्या मुठी केल्या आहेत. त्यापैकीं कांहीं खालीं देत आहे:—

| | | |
|---|---|---|
| १. दिल्लीशाई | २. औरंगजेबी | ३. सिंधी |
| ४. हकीमखानी | ५. बंगला | ६. गुजराथ |
| ७. पुरविया | ८. भुजी | ९. सिरोही |
| १०. करनशाई (जोधपुरी) | ११. कर्नाटकी | १२. शेरदहा |
| १३. मुल्हेरी (दक्षिणी) | १४. इराणी असली | १५. इराणी नकली |
| १६. इराणी पोपटघाटी | १७. सुरा घाटी | १८. कुवडी घाटी |
| १९. इंग्रजी मुठी वीस प्रकारच्या | २०. अब्बासी | २१. डोंगरपुरी |
| २२. घोड्याच्या तोंडाची | २३. सिंहाच्या तोंडाची | २४. मेंढ्याच्या तोंडाची |
| २५. बांसवाडी | २६. नांदोदी | २७. अकीकची |

२८. ईशबची २९. हस्तीदंती ३०. तखाराणा
३१. वाघाच्या तोंडाची ३२. कवडी घाटी ३३. गारदी
३४. सोजित्रा ३५. रामपुरी ३६. उदेपुरी
३७. महाराष्ट्रीय ३८. जाफराबादी ३९. अरबी
४०. फैजाबादी किंवा फैजपुरी.

मुठींचें वर्णन.

या मुठीपैकीं कांहीं मुख्य मुख्य मुठींचीं वर्णनें खालीं देत आहे. या मुठी श्री प्रतापशस्त्रागारांत आहेत आणि म्हणूनच त्यांचें वर्णन या पुस्तकांत उल्लेखनीय आहे.

## १. दिल्लीशाई मूठ

मोगरा गोल व लहान, फूल चपटे व लहान, कटोरी लहान चक्रीसारखी व कांठ जरा वर आलेले, पुतळा दोन्ही बाजूस निमुळता, व लांबींत कमी, ठोले आंखूड व डोकें लहान, नख्खा आंखूड. हा घाट प्रथम दिल्लींत बनला त्यावरून हें नांव पडलें.

## २. औरंगजेबी मूठ

घाट वरप्रमाणेंच, पण कटोरी जरा मोठी. शिवाय, कंठी व नक्षीच्या रेघा ही असतात. वरील घाटांत औरंगजेब बादशाह यानें थोडा फेरफार केल्यानें त्यास औरंगजेबी हे नांव मिळालें. तो फेरफार म्हणजे मुठीस सिंहाच्या तोंडाचें परज लावलें व त्याची शोभा वाढविली.

## ३. सिंधी मूठ

मोगरा फुलाच्या कळीसारखा, फूल उंच व मोठें, कटोरी वाटीसारखी मध्यें खोल, पुतळा लांब, निमुळता व थोडा पातळ, ठोले लांब व डोकें भारी, नख्खा लांबट. हा घाट सिंधमध्यें बनला व तो अजून तिकडे प्रसिद्ध आहे.

## ४. हकीमखानी मूठ

मोगरा एक तसू लांब, फूल मोठें व पडघीदार, कटोरी चक्रीसारखी व जाड, पुतळा कंठीदार व त्यावर नक्षीची रेघ पुतळ्याचे गाळें लहान व जाड, ठोले लांब

व डोकें सुपारीसारखें, नख्खा लांब व जाड, परजदार. या घाटास नांव देणारा हकीमखान हा कोण, कोठें झाला याची बरोबर माहिती मिळत नाहीं. पण यानें दिल्लीशाई घाटामध्यें कांहीं जास्त सुधारणा केली आहे.

## ५. बंगला मूठ

मोगरा लहान व खोल, फूल कमरखी घाटाचें, कटोरी थोडी खोल, पुतळा लांब, गोल व फारच निमुळता, ठोले आंखूड, चौकदार व उठविलेल्या रेघांचे फूल असते. परजदार. या घाटास फैजाबादी व सिताकी–रसोई अशीं नांवें आहेत. फैजाबाद–आयोध्येच्या समोरील शरयूच्या किनाऱ्यावरील शहर. येथें एका बंगल्यांतील घरांत ही मूठ प्रथम बनली. म्हणून हिला बंगला व फैजाबादी हीं नांवें पडलीं. अवध हें हिंदुस्थानांतील अयोध्येच्या राज्यास म्हणतात. तेथें हीं मूठ फार प्रसिद्ध असल्यानें या घाटास अवध म्हणतात. चौकावर जें फूल उठविलें आहे त्यावरून सिताकी रसोई हें नांव पडलेलें आहे.

## ६. गुजराती मूठ

मोगरा अणीदार, फूल चपटें, कटोरी चक्रीसारखी, पुतळा, चौकोनी व धार व पाठ यांकडे अणीदार, ठोले फिरकीसारखे, डोकें अंगचें नसून जोडलेलें, नख्खा लांब व त्याचें टोंक नागफणीसारखें, परजदार. हा घाट गुजराथेंत प्रथम निघाला असून अजूनही इकडे प्रसिद्ध आहे.

## ७. पुरविया मूठ

मोगरा लहान व गोल, नंतर कंगणी, फूल लहान, कटोरी कंगणीदार असून थोडी खोल, पुतळा कंठीदार व जनेऊदार, ठोले चपटे, सतारीच्या खुंटी-प्रमाणें, नख्खा लांब व टोंकास कंगरेदार असून परजदार. काशीच्या आसपास हा घाट प्रथम झाला व उत्तर हिंदुस्थानांतच त्या भागास पूरब म्हणजे पूर्वेकडील देश म्हणत असल्यानें या घाटास हें नांव मिळालें आहे.

## ८. जोधपुरी अथवा करनशाई मूठ

गुजरातीप्रमाणें, परंतु कटोरी थोडी मोठी व नल्याचें टोंक फक्त चपटें. जोधपूरच्या करन नांवाच्या राजानें हा घाट प्रथम तयार करविला म्हणून यास वरील दोन्ही नांवें पडलीं आहेत.

## ९. भुजी मूठ

हकीमखानीप्रमाणें, परंतु मोगरा व फूल यामध्यें कंगणी असते. फूल मोठ्या बत्ताशाप्रमाणें, पुतळा, नल्ला व परज पैलुदार. कच्छची राजधानी भूज येथें हा घाट प्रथम बनला व हल्लींही तेथें तो प्रचलित आहे. अर्थात् यास भुजी हें नांव मिळालें.

## १०. सिरोही मूठ

दिल्लीशाईप्रमाणें परंतु फूल मोठें व कटोरी थोडी खोल, वाटीसारखी. आबू पर्वताखालीं सिरोही नांवाचें राज्य आहे. त्याचें राजधानींत हा घाट प्रथम झाला व त्यावरून त्यास हें नांव मिळालें.

## ११. मुल्हेरी अथवा महाराष्ट्रीय मूठ

मोगरा गोल असून त्याखालीं तीन तसू लांब गज असतो. फूल नागवेलीच्या पानाच्या आकाराचें, कटोरी खोल व त्याच पानाच्या आकृतीची, पुतळा गुजराती घाटांत वर्णिल्याप्रमाणें, ठोंके आंखूड व डोकें सुपारीप्रमाणें, नल्ला लांब, परज खपडेदार. हा घाट प्रथम मुल्हेरीस बनला व तो सर्व दक्षिण प्रांतात पसंत होऊन प्रचलित झाला. यामुळें ही नांवें त्यास मिळालीं. परजनें हाताचें संरक्षण फारच चांगलें होतें.

## १२. कर्नाटकी मूठ

मोगरा गोल असून ६ तसू लांब गज असतो. फूल उलट्या वाटीप्रमाणें, कटोरी मोठी व खोल, पुतळा बारीक व गुजराथी घाटांत सांगितल्याप्रमाणें चामडें मढविलेला, ठोंके नाहींत, नल्ला फार लांब व तलवारीचे पानास

कमरमें नारसिंहक, हाथमें भाला, पगडीमें छूरी,
पीठपर ढाल, यही मर्द चौरंगा कहा जाय।



लढाईशिवाय केव्हांही स्वातंत्र्य प्राप्ति शक्य नाहीं. लढाई निकराची, तुमुल, जिला विजयाशिवाय किंवा स्वर्गाशिवाय दुसरा तह ठाऊक नाहीं.

—मॅझिनी—




चित्र नं. ३२, ३३







चित्र नं. ३४, ३५

## १८. इंग्रजी मूठ

या मुठीचा पुतळा चपटा असून मागील भाग गोल असतो. याच्या डोक्यापासून खालच्या भागाला परज जोडलेला असतो.

## १९. रामपुरी मूठ

मोगरा लांब पण घाटदार, कंगणी, बतासा, फूल लहान, मुट्ठा गोल, परज नाहीं, कटोरी जाड पण थोडी खोल, चौक, जानवें व गळ्यांत कंठी, ठोले आंखूड व गोल, नख्खे लहान नकशीदार असतात.

## २०. गारदी मूठ

मोगरा लांब व वांकदार, बतासा लहान, कटोरी मध्यम, मुट्ठा अणकुचीदार, परजचें डोकें मोगरा वांकवून कटोरीस भिडविलेलें परंतु भजबूत, नख्खे फार लांब, ठोले चप्पट पण डोकें मोठें. अशा मुठीस गारदी म्हणतात.

## २१. उदेपुरी मूठ

मोगरा लांब, कंगणी साधारण, बतासा लहान, फूल मोठें, कटोरी मोठी, ठोले लांब पण चप्पट, डोकीं गोल पण चप्पट, नख्खे लांब. उदेपुरांत ही झाली म्हणून हीस हें नांव मिळालें.

## २२. दक्षिणची मूठ

मोगरा लहान, त्यांत भोंक, बतासा लहान, फूल मोठें, ठोले लहान पण गोल, नख्खे लहान. मुल्हेरीप्रमाणें हीही दक्षिणेंत वापरण्यांत येत असे.

## २३. जाफराबादी मूठ

मोगरा मध्यम प्रकारचा लांब, कंगणी अगदीं लहान, बतासा बेंट्या घाटाचा, फूल पांकळीदार लांब, कटोरी गोल, पुतळा मोठा, परज सिंहाच्या तोंडाचें, ठोलें गोल, नख्खे नकशीदार व भोंकें असलेलें.

## २४ अरबीघाट मूठ

डोक्याला चोंच, चप्पट पुतळा म्हणजेच मुठा चप्पट, ठोल्यांची डोकीं मोठीं पण आंखूड, नख्खे गोल पण आंखूड.

या स्थळीं आम्ही नाना प्रकारच्या मुठींचीं चित्रें दिलीं आहेत, त्यावरून एकंदर बोध होण्यासारखा आहे. तसेंच बहुतेक प्रकारच्या तलवारींचीं चित्रें दिलीं असून त्यावर असलेल्या मुठींचींहि नांवें त्यांस देण्यात आलेलीं आहेत. त्यामुळें सर्व प्रकारच्या मुठींचीं चित्रें देण्याची आवश्यकता वाटली नाहीं.

अनेकविध मुठी.

कित्येक लोक हस्तीदंत, सांबरसिंग, वनगाईचें शिंग, तर म्हशीचें शिंगही मुठीसाठीं वापरतात. लोखंडावर यांच्या चिफा लावतात. चिफासाठीं सिसम, खैर, सागवान वगैरे प्रकारचें लांकूड सुद्धां वापरतात. कांहीं ठिकाणीं अकीकच्या तर कांहीं ठिकाणीं इशबच्याही मुठी वापरतात. अकीकच्या मुठी तर किंमती असतातच, परंतु इशबच्या तर त्याहुनही मौल्यवान् असतात. पोलादाच्या मुठीवर कोरींव काम आढळतें असल्या मुठी फार किंमती असतात.

धातूच्या मूठी.

पक्क्या पोलादाच्या मुठी फारच क्वचित आढळतात. अलीकडे पितळ, जर्मन सिल्व्हर, तांबे, चांदी किंवा क्वचित् राजदरबारीं सोन्याच्याही मुठी तयार करण्यांत येतात.

मूठ कशी असावी.

वर जे मुठीचे जवळ जवळ ४० प्रकार दिले आहेत त्या सर्वांचे वर्णन मोठ्या पुस्तकांत येणार आहे. उदाहरणार्थ म्हणून कांहीं मुठींचा उल्लेख केला आहे एवढेंच. कोणत्या तलवारीस कोणती मूठ बसवावी ही गोष्ट ज्याचे त्याचे आवडीची आहे. लक्षांत एवढेंच ठेवावें कीं, पान जर जड असेल तर त्याच्या प्रमाणांत जोरदार मूठ असावी. भारी पानाला जर हलकी म्हणजेच नाजूक मूठ बसविली तर तलवार वापरण्याचे वेळीं त्रास होण्याचा संभव असतो. म्हणजे वार चांगला बसणार नाहीं. केव्हां केव्हां हात सांध्यातून निसळतो.

## मूठ बसविण्याची रीत

मूठ बसविण्यासाठीं प्रथम मुठीचा खजाना साफ करून घ्यावा. नंतर त्यांत पिंपळाची गरम लाख खजान्याचा भाग उंच करून ओतावी. मूठ सोन्याची, चांदीची, मिन्याची अगर रंगाची असल्यास अग्नींत टाकूं नये. मूठीवरील काम बिघडूं नये या साठीं तिला स्वच्छ कापड गुंडाळून ती सांडशींत धरून ठेवावी. अशी मूठ बसवितांना सळ्या तापवून त्यानें लाख मूठींत भरावी लागते.

पूर्व तयारी.

खजान्यांत लाख भरल्यावर तलवारीच्या पात्याचा दुमाला खूप गरम करून खजान्यांत घालून बरोबर मध्याला बसल्याची खात्री करून घ्यावी. नंतर तलवारीच्या पात्यावर कापड लपेटून तलवारीचें पान खूप खोंचून बसवावें. थंड होतांच मुठींत धरून भक्कम बसल्याची खात्री करून घ्यावी. मूठ बसविणें हें कौशल्याचें काम आहे. जर कां लाख कची राहिली, पान ढिलें राहिलें अगर मूठ व्यवस्थितपणें बसली नाहीं तर वार करते वेळीं पान निराळें पडून मूठच हातांत राहण्याचा प्रसंग यावयाचा. कित्येक लोक चपडी लाख, राळ किंवा सरस मूठ बसविण्याकरितां वापरतात तें बरोबर नाहीं. असें करणें धोक्याचें आहे. पिंपळाची लाख लोखंड अगर पोलाद याला चांगली आकर्षते आणि म्हणून ही लाख नेहमीं पसंत करावी.

पान बसविणें.

शिकारीस जाते वेळीं साध्याच मुठीच्या तलवारी वापराव्या. सोनें, चांदी वगैरेसारख्या चकाकणाऱ्या धातूच्या मुठीं वापरण्यानें शिकारी जनावर पळून जातें असा अनुभव आहे. अशा ठिकाणीं साध्या पण रंगीन काळ्या निळ्या मुठीं वापरणें चांगलें सोईस्कर होईल.

शिकारी मूठ.

### म्यान

पानाचें रक्षण करण्याचें काम म्यानाचें आहे. धार असलेल्या वस्तू नेहमीं बंद करून ठेवाव्या. त्या जर उघड्यावर ठेविल्या तर त्यांस हवेनें गंज चढून धारेचें पाणी कमी होतें.

म्यानाची उपयुक्तता.




चित्र नं. ३८, ३९

म्हणून तलवारी म्यान, पेटी अगर कपाट यांत नीट ठेवाव्या. पेटी व कपाट यापेक्षां म्यान जास्त सुटसुटीत व व्यवस्थित असतें.

म्याानाचे प्रकार.

म्यान अनेक प्रकारचें करतात. दोन हजार वर्षांपूर्वी देखील लाकडाचें म्यान व त्यावर हल्लींप्रमाणें किंमती अशा गुलाबी रंगाचें कापड असें अशीं वर्णनें सांपडतात. म्यानाचे कांहीं प्रकार खालीं दिले आहेत:—

| | |
|---|---|
| १. सोन्याचें म्यान | १०. कचकड्याचें म्यान |
| २. मिन्याचें म्यान | ११. पितळी म्यान |
| ३. चांदीचें म्यान | १२. तांब्याचें जाळीदार म्यान |
| ४. भरगच्चीचें म्यान | १३. लांकडी म्यान |
| ५. किनखापाचें म्यान | १४. निकलचें म्यान |
| ६. जरदोशी म्यान | १५. पत्र्याचें म्यान |
| ७. चंदनाचें म्यान | १६. कापडी म्यान |
| ८. मखमलीचें म्यान | १७. चामडी म्यान |
| ९. पोलादी म्यान | १८. कारचोबचें म्यान |

१९. जाड्या कागदाचें म्यान.

लांकडाची जरूर.

पोलाद, पितळ, तांबें, चांदी यांखेरीज कसलेंही म्यान करावयाचें असलें तर प्रथम त्याकरितां खोके म्हणून लांकडाचें म्यान तयार करावें लागतें. पोलाद, पितळ, तांबे, सोने, चांदी यांचे म्यानावर जर नक्षीकाम करून घ्यावयाचें असेल तर त्यांसही प्रथम लांकडीं खोकें असणें जरूर आहे.

चांगलें लाकूड.

या साठीं म्यान करते वेळीं कोणतें लांकूड वापरावें व कोणतें वापरूं नये ही गोष्ट महत्त्वाची ठरते. खालीं नमूद केलेल्या लाकडांपैकीं, लांकूड साधारणतः या कामासाठीं वापरण्यांत येतें.

१. सेवन २. हलवा ३. अडुळसा ४. ओक
५. देवदार ६. आंबा.

सेवनचें लाकूड.

सेवनचें लांकूड टिकाऊ, चिवट, व सफाईदार व हलकें असतें. त्याच्या रेषा सारख्या असल्यानें त्यावर पॉलिश चांगलें होतें व कापडही छान बसतें. असें कापड लावतांना तें शुद्ध सरसानें चिटकवावें म्हणजे त्यावर जंतूंचा परिणाम होत नाहीं. खळींत मोरचूत टाकून कापड लावतात पण त्यायोगें कापड लवकर काळें पडण्याचा संभव असतो. सेवनच्या लाकडानें तलवारीस लवकर गंज लागत नाहीं. बाकीच्या लाकडांत हवा शिरतें व त्यामुळें तलवार गंजण्याचा संभव विशेष असतो. सेवनचें लाकूड जरी महाग पडतें तरी वरील उपयुक्ततेमुळें तेंच वापरावें हें योग्य.

हलवा व अडुळसा.

हलवा व अडुळसा या लांकडाच्या जाती स्वस्त असल्यानें सर्व जण त्या वापरूं शकतात.

ओक, देवदार व आंबा.

ओकच्या लांकडाचें म्यान सुद्धां महागच पडतें. देवदार अगर आंब्याचें म्यान मात्र जें कित्येक ठिकाणीं वापरतात ती चूक आहे. या लांकडाला उधई फार लवकर लागते. परिणाम असा होतो कीं, म्यानावरील भारी कापड बिघडून जाते व तलवारही गंजून जाते.

म्यानावरील कापड.

अनेक तलवारींचीं म्यानें एकदम करविण्यांत अखंड कापड प्रत्येक म्यानास मिळूं शकतें. एक म्यान करण्यांत कापड जास्त लागतें. एकदम म्यानें केल्यानें सांध्यावांचूनचीं म्यानें मिळूं शकतात. मखमल अगर भरगचीच्या कापडाचा पन्हा फारच आंखूड असल्यानें लोक जोड लावून म्यानें तयार करतात. परंतु सांधा असलेलें म्यान चांगलें दिसत नाहीं. कापड सात इंच रुंद असलें म्हणजे साधारणतः तलवारीचें म्यान तयार होतें.

चामड्याचें म्यान टिकण्यास उत्तम असतें. तें लवकर खराब होत नाहीं.

चामड्याचें म्यान.

चामडें सांवरी, कथ्थाई, खाकी मुंगीया, मिटिया या रंगाचें चांगलें दिसतें. रंग–पसंती ही अर्थात् ज्यानें त्यानें स्वतःचे आवडीनुसार करावयाची असते. वर दिलेलें रंग फक्त शिकारी लोकांनींच पसंत करावयाचे आहेत. या रंगाचें योगानें शिकार बिचकत नाहीं. बाकीच्या रंगांच्या योगानें शिकार बिचकण्याचा संभव असतो. इतर लोकांनीं कोणताही आवडीचा रंग पसंत करण्यास हरकत नाहीं.

दरबार प्रसंगीं वापरण्यासाठी जीं म्यानें ठेवावयाचीं तीं उत्तम कापडाचीं

दरबारी म्यान.

ठेवावींत. कापडांत मनपसंत वाटेल तेवढे रंग मिळूं शकतात. हल्लीं पडताळ्याचे पट्टे दरबार प्रसंगीं वापरतात.

कित्येक श्रीमान् लोक म्यानावर जडावाचें काम करून घेतात. पूर्वीचे

राजेशाही म्यानें.

राजेमहाराजे यांच्या तलवारींचीं म्यानें हजारो रुपये किंमतीचीं असलेलीं आढळून येतात. साधारणतः राजेशाही म्यानें म्हणजे जडावू (मोती, हिरे, माणिक, पाचू वगैरे जडविलेलीं), सोनें, चांदी, भरगची व किनखाप बसविलेलीं, हीं होत.

म्यान तयार केल्यावर त्यावर शिवण दिसूं नये म्हणून फीत लावतात. हे

फीत व गोफ.

गोफ, फीत वगैरे पटव्यांकडे तयार मिळतात. खरा गोफ सव्वा रुपायापासून पावणेदोन रुपये तोळ्या-पर्यंत मिळतो.

म्यानावर जी शिवण राहते तीवर तारफणी लावण्याचीहि पद्धत आहे.

तारफणी.

ही तारफणी स्वतःचे शक्तीप्रमाणें लावतां येते. हिची किंमत बारा आण्यापासून रुपये वीसपर्यन्त असूं शकते. म्यानावर तारफणी लावण्याची स्वतंत्र मजूरी द्यावी लागते. म्यानाचे मजूरींत ती धरतां येत नाहीं. तारफणी जरी महाग पडते तरी त्यायोगें तलवार चांगली दिसते व म्यान पुष्कळ टिकतें.

तलवारीचे रंग चार असतात आणि अंगें आठ असतात. तलवारींची परिक्षा करतांना हे रंग व हीं अंगें विचारांत घ्यावयाचीं असतात व म्हणून त्यांना महत्त्व आहे.

तलवारींची परिक्षा.

## तलवारीचे चार रंग

| १. निळा | २. काळा | ३. धुरकट | ४. पिंगट |
|---|---|---|---|

## तलवारींचीं अष्टांगें

| १. अंग | २. रूप | ३. जाति | ४. नेत्र |
|---|---|---|---|
| ५. अरिष्ट | ६. भूमि | ७. ध्वनि | ८. परिमाण |

## अष्टांग विचार

अंग.

तलवार तयार झाल्यावर तिच्या शरीरावर जीं नाना तऱ्हेचीं चिन्हें, जसे खाडे, चट्टे, सांधे, रंग, जव्हेर, अभ्रें व माळ वगैरे राहतात त्यांस अंग म्हणतात. अंगें १०० प्रकारचीं असतात.

रूप.

२. तलवारीचा घाट उत्तम असावा. तीवर वीरश्रीभरित एखादें वाक्य असावें. धार व अणी तीक्ष्ण असावी. मूठ लाखेंत भक्कम बसविलेली असून ती पानाच्या प्रमाणांत असावी. अशा सर्व गुणांनी जी तलवार युक्त असते तिलाच रूपवान् तलवार असें म्हणतात.

जाति.

३. तलवारीच्या जाती चार आहेत :— १. ब्राह्मण २. क्षत्रिय ३. वैश्य ४. शूद्र. या शिवाय या जातींमध्यें जातिसंकरही होत असतो.

ब्राह्मण तलवार.

१. ब्राह्मण जातीची तलवार चांगली असते. तिचा आवाज गोड असतो. तिच्या योगानें थोडी इजा झाली तरी अंग दुखतें, सूज येते, मूर्च्छा येते, तहान लागते, दाह होतो व

मारजो के मरजो तमे, नव देशो पुंठ लगार;
सैयर मेणां मारशे, जे कायर केरी नार.



"प्राणहि देईन, परि सोडी ना
धर्म कधीं अपुला
सांगतो पुनः पुनः मी तुला।
कंठनाळ जरि चिरशिल माझा
म्हूण एक सांगतो
मराठा मरणाला ना भितो" ॥
–संभाजी–



चित्र नं. ४०, ४१

तापाचा वेग वाढल्यानें लवकरच प्राण निघून जातो. ब्राह्मण - तलवार हिमालय व कुशद्विपामध्यें तयार करीत.

क्षत्रिय तलवार.

२. धुरकट रंगाच्या, तीक्ष्ण धारेच्या व नाददार आवाजाचे तलवारीस क्षत्रिय तलवार म्हणतात. ही संस्कार न करतां देखील पुष्कळ दिवस तेजस्वी राहते. म्हणजेच परिष्कार राहते. सहाण यंत्रावर जर हिला ठेवली तर तींतून खूपच अग्नीकण निघत राहतात. हिची इजा झाल्यास तहान वाढते, दाह होतो, मलमूत्रावरोध होतो, ताप येतो, मूर्छा वाढते व कित्येक वेळां मनुष्य मृत्यु पावतो.

वैश्य तलवार.

३. वैश्य जातीय तलवार निळ्या व काळ्या रंगाची असते. हिच्यावर संस्कार केल्यास ही फार उज्वल दिसते. हिला तीक्ष्णता मात्र सहाणेवर चढविल्याशिवाय येत नाहीं. हिचा आवाज कमी असतो.

शूद्र तलवार.

४. जी तलवार दिसण्यांत पिंगट वर्णाची अगर मेघ वर्णाची असते, जिची धार मोठी असते, जिचा ध्वनि कर्कश असतो व जी सहाणेवर चढविली असतांही तीक्ष्ण होण्याला वेळ लागतो तिला शूद्र तलवार असें म्हणतात.

नेत्र.

४. तलवारीचे नेत्र सर्वांना ओळखतां येणें कठीण आहे. नेत्र म्हणजे तलवारीवरील चिन्हें होत. खातेवार, गटबंदी, चमनबंदी यांचे मध्यें नेत्र म्हणजे डोळे सहज दिसून येतात. नेत्र तीस प्रकारचे असतात.

तीस प्रकारचे नेत्र.

चक्र, खड्ग, गदा, पद्म, डमरु, धनुष्य, अंकुश, छत्र, पताका, वीणा, मत्स, लिंग, ध्वज, इंदु, कुंभ, शूल, शार्दूल, सिंह, सिंहासन, गज, हंस, मयूर, जिव्हा, दशन, पुत्रिका, चामर, शैल, पुष्पमाला, भुजंगम या प्रमाणें तीस नेत्र आहेत.

५. करवालाच्या अमंगल जनक चिन्हांसच अरिष्ट म्हणतात. अरिष्ट तलवार म्हणजे अरिष्ट आणणारी तलवार. तेव्हां अरिष्ट म्हणजेच अशुभ तलवार घेवूं नये. ज्या तलवारींवर बेडुक, कावळे, गिधाड, पाकोळ्या, घाणींत राहणारे किडे वगैरे असतील त्या तलवारी अशुभ समजल्या जातात. या शिवाय ज्या तलवारींत पत्री पडतें, ज्या तलवारीवर खाडे असतील, ज्या तलवारीचा ध्वनि बदबद निघत असेल, त्या तलवारी अशुभ होत.

अरिष्ट.

६. जिचा ध्वनि खणखणीत आहे; ज्या तलवारीवर ध्वज, चामर, सिंहासन, आहे; हंस, हत्ती, घोडे, सिंह, व्याघ्र, गाय आहे; ज्या तलवारीचा रंग शुभ्र, निळा अगर काळा आहे, ज्या तलवारीवर जव्हेर किंवा अभ्र भरलेलें आहे ती तलवार शुभ समजावी. ज्याप्रमाणें घोड्याची उत्तम लक्षणें पहावीं लागतात, त्याचप्रमाणें तलवारीचे गुण पहाणें जरूर असतें. हीं वरील शुभ चिन्हें जव्हेर किंवा अभ्र यांतच आढळतात. कित्येक तलवारीवर माळा असतो. त्या तलवारी शुभ समजाव्या.

शुभ तलवारी.

७. तलवारीची भूमि हा शब्दप्रयोग दोन अर्थानें वापरण्यांत येतो. एक क्षेत्र किंवा काया, व दुसरा जन्मस्थान. तलवारीचा चांगुलपणा किंवा वाईटपणा जन्मस्थानावरही अवलंबून असतो. जन्मस्थान—भूमि दोन प्रकारची असते. एक दिव्य व दुसरी भौम. स्वर्गांत तेजलोह उत्पन्न होते त्याचें नांव दिव्य व भारत वर्षांत जे उत्पन्न होते त्याचें नांव भौम. युक्तिकल्पतरु नांवाच्या संस्कृत ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, देवासुर युद्धांत प्रथमतः तलवारी निघाल्या व त्या कांहीं कांहीं ठिकाणीं ठेविल्या गेल्या. अशा ज्या तलवारी येथें सांपडतात त्या दिव्य तलवारी होत. भारत देशांत उत्पन्न होणारें लोह दोन प्रकारचे. एक अमृतजन्मा व दुसरें विषमजन्मा. त्यावेळीं असें मानलें जात असे कीं, वाराणसी, मगध, सिंहल, नेपाळ, अङ्गदेश, सुराष्ट्र वगैरे ठिकाणीं होणाऱ्या तलवारी उत्तम होत.

भूमि.

## दिव्यलक्षणीखड्ग

ये खड्गाः स्थूलधारा, भृशमतिलघवो निर्मलांगाः सुनेत्राः ।
ये स्निग्धाश्चास्वरूपाः, सविमलतनवश्चाप्यसंस्कारयोगात् ॥
दुर्भेद्या दुर्घटाश्च, ध्वनिगुणगुरवो यत्क्षते दाहपाकाः ।
तं दिव्याः कुर्वतेऽमी कुलधन–विजय–श्रीयशोवृद्धिमाशु ॥१॥

**भावार्थ :**–ज्या तलवारींची धार जाड आहे ( वासलावाढ ), ज्या अतिशय ल्हान व "अंगांनीं" निर्मल असून ज्यांचे नेत्र सुरेख आहेत, ज्या जहरी असून ज्यांच्यावर कृत्रिम शोभा आणलेली नसते, बाह्य संस्कार न करतांही ज्या विशुद्धच असतात ( अग्नि व पाणी देणें किंवा अभ्र वा जव्हेर भरणें हे संस्कार शोभा देणारे नसून गुण वाढविणारे असल्यामुळें त्यांची बाह्य संस्कारांत गणना केलेली नाहीं...), ज्या मोडूं शकत नाहींत व ज्यांची घडणही कठीण असते, ज्यांचा नाद मोठा असतो, ज्यांच्या प्रहारामुळें जखमेंत दाह निर्माण होतो, त्या तलवारी दिव्यलक्षणी होत. त्यांना धारण करणाऱ्या लोकांच्या वंशांत पराक्रम, संपत्ति व यश यांची सत्वर वाढ होते.

## भौमखड्ग

ये खड्गास्तीक्ष्णधारा, भृशमतिगुरवो षड्गुणाढ्याः सुभेद्याः ।
केचित् साङ्गा निरंङ्गाः, कतिचन समला निर्मलाः केचिदेव ॥
ते भौमाः कुर्वतेऽमी धनविजयबलं षड्गुणा निर्गुणा वा ।
ते दुःखं स्तोकमुग्रं दधति बलकुलश्रीयशोनाशनास्ते ॥ २ ॥

**भावार्थ :**–ज्या तलवारींची धार तीक्ष्ण असून ज्या खुप मोठ्या असतात, ज्या षड्गुणांनीं युक्त असून ज्या लवकर मोडतात, ज्यांच्या पैकीं कांहीं "अंगांनीं" युक्त असतात तर कांही नसतात, तद्वतच कांहीं मळकट तर कांहीं निर्मल राहतात, त्यांना भौम खड्ग असें म्हणतात. या पैकीं ज्या षड्गुणांनीं युक्त असतात, त्या 'धनविजयबल' यांची प्राप्ति करून देतात,

पण ज्या निर्गुण असतात त्या 'बल, कुल, श्री, यश' यांच्या नाशाला कारणीभूत होतात आणि त्यांच्या पायीं लहान वा प्रसंगीं मोठेंहि दुःख प्राप्त होतें.

युक्तिकल्पतरू,
अध्याय ७, पृष्ठें १६९–१७१.

युक्तिकल्पतरू वगैरे प्राचीन ग्रंथांतून वरीलप्रमाणें तलवारी संबंधीं उल्लेख आढळतात, औशनस धनुर्वेदांतहि तलवारीच्या तीन भागांचें खालीलप्रमाणें वर्णन दिलें आहे: –

| भाग | तलवारीचें नांव | लांबी अंगुलें | रुंदी अंगुलें | वजन छटाक |
|---|---|---|---|---|
| १. लहान | १. क्रियाखड्ग | २० | २ | २२ |
| | २. मरकखड्ग | २८ | २ | २४ |
| | ३. मारखड्ग | ३६ | २ | २६ |
| | ४. मार्गध्थखड्ग | ४४ | २ | २८ |
| | ५. चित्रतालितखड्ग | ५२ | २ | ३० |
| २. मध्यम | १. सुखसंचारखड्ग | ६० | ४ | ३२ |
| | २. सुखसंनाह्यखड्ग | ६८ | ४ | ३४ |
| | ३. मध्यम | ७६ | ४ | ३६ |
| | ४. मध्योत्तम | ८४ | ४ | ३८ |
| ३. उत्तम | १. दुर्धर्ष | १०० | ६ | ४२ |
| | २. विजय | १०८ | ६ | ४४ |
| | ३. सुनन्द | ११६ | ६ | ४६ |
| | ४. नन्दन | १२४ | ६ | ४८ |
| | ५. श्रेष्ठ | १३२ | ६ | ५० |

या शिवाय वरील ग्रंथांत खालीलप्रमाणें या बाबतींत उल्लेख सांपडतोः—

१. अग्रपृथु :–जिचा पुढचा भाग वजनदार असेल ती.

२. मूलपृथु :–जिचा मुळांतील भाग मोठा असेल ती.

३. संक्षिप्त मध्य :–जिचा मधला भाग पातळ असेल ती.

४. समकाय :–जिचा सर्व भाग सारखा असेल.

५. पिंडित :–जिला चिमटे लावलेले असून जिची घडी होत नाहीं किंवा जिला लवविता येत नाहीं.

६. पत्र :–जी एक सारखी पातळ असून लवचीक असते.

७. एकधारा :–ज्या तलवारीस एकच धार असते ती.

८. द्विधारा :–जीस दोन्ही बाजूस धार असते ती.

तलवारीचें योग्य मोजमाप.

पूर्वीच्या तलवारींच्या मोजमापांत व आत्तांच्या तलवारींच्या मोजमापांत फरक पडण्याचें कारण पूर्वीच्या मनुष्यांत व हल्लींच्या मनुष्यांत फरक पडला हेंच होय. वरील प्रमाणें जरी पूर्वीच्या तलवारींचीं मापें दिलीं आहेत तरी सर्व साधारण नियम असा सांगता येईल कीं, तलवारीच्या पानाची लांबी, रुंदी, वजन वगैरे मनुष्याच्या प्रमाणांत असावे. पायदळानें वापरावयाच्या व घोडदळानें वापरावयाच्या तलवारी यांच्या मापांतही फरक पडणार. पायदळाचें कामीं उपयोगांत येणारी तलवार फार लांब असतां उपयोगी नाहीं. तलवारीची रुंदी जितकी जास्त तितकी तलवार चांगली. आपणांकडील कर्नाटकी धोप फारच लांब असतो. पोर्तुगीज लोकांनीं शिवाजी महाराजांना ज्या तलवारी नजर केल्या त्या देखील बऱ्याच लांब होत्या. रणजितसिंगाचें वेळीं फ्रेंच लोकांनीं इराण, तुर्कस्थान मधून लांब सेफ आणल्याचें इतिहासावरून दिसतें.

पवित्रे.

तलवार ल्हान असो वा मोठी असो, लांब असो वा रुंद असो, ज्याला उत्तम प्रकारें पवित्रे घेतां येत असतील तो ल्हान अरुंद तलवारीनें सुद्धां मोठ्या व रुंद तलवारवाल्यास हार जात नाहीं असा आजही अनुभव येतो. हिंदूंचा पवित्रा म्हणजे हनुमंती, नारसिंही, सुरखी हा असे. कर्नाटकी लोकांनीं कर्नाटकी पवित्रा चालू केला.

## कपाट नं. १७



१, २, ३५, ३६ तिहँघाटी सुरे. ३, ४, ५, ६, ३२, ३३, ३४ पेशकबज. ७ माळा-वाळी. ८, २६ चापानेरी. ९ धवलगिरी. १० मेवाडी. ११, २७, २८ गोलिया. १२ कत्ती. १३, १४ अलेमान पट्टणी. १५ करपाल. १६ लालुवाड. १७ कम्मा. १८ कच्छी. १९ माइ. २० तेगा. २१ सुरी. २२ जोधाना. २३ कत्ती नक्षीदार. २४ जोधपुरी. २५, ३१ शिरोही. २९ पचाशाई. ३० पोतारशाई. ३७ अरबीपुरा. ३८ कर्नाटकी धोप.

२८. पादार्धकमल २९. प्रत्यालीढ ३०. आलीढ

३१. वराह ३२. ललित

याच ग्रंथांत असेंही म्हटलें आहे कीं, राजे महान्‌यत्नानें असिचालना शिकत असत.

विषारी तलवारी म्हणजेच जव्हेरदार तलवारी. विष दोन प्रकारचें आहे. जव्हेरदार व अभ्रदार. पूर्वी तलवारीनें युद्धें होत व त्यामुळें तलवारी मजबूत बनविण्याचा प्रयत्न करीत. एवढेंच नव्हे तर विषारीही बनविण्याचा प्रयत्न करीत.

जव्हेरदार, अभ्रदार तलवारी.

तलवारी विषारी बनविण्याकरितां तलवारीच्या पात्यांत सोमल, बचनाग, विबवा, जहरकुचला, अगस्ती, भुईमुगाचे मोड, एवढेच नव्हे तर सापाचें गरळ, पालीचें गरळ अशीं ज्वलज्जहा विषें लतलवारीच्या पात्यांत भरून ती तलवार बांधून मग विस्तवांत टाकीत. ती चांगली तापल्यावर तिला घणानें ठोकून पुन्हां अनेक जातीच्या विषांचें पाणी तयार करून त्या पाण्यांत ती तलवार पिववित. असे सात अग्नी दिल्यावर ती तलवार जव्हेरदार होत असे. दुसरी तऱ्हा म्हणजे वरीलप्रमाणें विषें भरल्यावर तलवार बांधून ठेवित व सहस्रपुटी अभ्रकाप्रमाणेंच वर्षानुवर्षें प्रयोग करीत. आतां असल्या प्रयोग झालेल्या तलवारी मात्र कुठेंच होत नाहींत.

जव्हेर कसे देतात.

जव्हेर पानावर कसें उमटतें असा कित्येकांस प्रश्न पडतो. यासाठीं पुढील कृति आहे. उत्तम चंद्रवट ठोकून त्याचा पत्रा तयार करावयाचा. जें वीप पसरावयाचें असेल त्याचें मिश्रण या पत्र्यावर तयार करावयाचें व मग तें जरूर त्या तलवारीच्या पत्र्यावर पसरून द्यावयाचें. नंतर ज्याप्रमाणें नक्षी पाहिजे असेल त्याप्रमाणें तो पत्रा सारखा दाबून घेवून त्यावर मेणाची बारीक पोळी दाबून बसवावयाची. नंतर त्यावर दुसरें एक तलवारीचें पातें सारखें दाबून बसवून ती तलवार बांधून ठेवावयाची. दुसऱ्या दिवशीं तलवार धावड्याच्या अगर खेराच्या अगर रायणीच्या कोळशाच्या अग्नींत टाकावयाची. नंतर घणानें गरम गरम

जव्हेर पानावर कसें उमटतें.

२८. पादार्धकमल　　२९. प्रत्यालीढ　　३०. आलीढ

३१. वराह　　३२. ललित

याच ग्रंथांत असेंही म्हटलें आहे कीं, राजे महानूयत्नानें असिचालना शिकत असत.

विषारी तलवारी म्हणजेच जव्हेरदार तलवारी. विष दोन प्रकारचें आहे. जव्हेरदार व अभ्रदार. पूर्वी तलवारीनें युद्धें होत व त्यामुळें तलवारी मजबूत बनविण्याचा प्रयत्न करीत. एवढेंच नव्हे तर विषारीही बनविण्याचा प्रयत्न करीत.

जव्हेरदार, अभ्रदार तलवारी.

तलवारी विषारी बनविण्याकरितां तलवारीच्या पात्यांत सोमल, बचनाग, विषवा, जहरकुचला, अगस्ती, भुईमुगाचे मोड, एवढेच नव्हे तर सापाचें गरळ, पालीचें गरळ अशीं ज्वलज्जहा विषें ततलवारीच्या पात्यांत भरून ती तलवार बांधून मग विस्तवांत टाकीत. ती चांगली तापल्यावर तिला घणानें ठोकून पुन्हां अनेक जातीच्या विषांचें पाणी तयार करून त्या पाण्यांत ती तलवार पिववित. असे सात अग्नी दिल्यावर ती तलवार जव्हेरदार होत असे. दुसरी तऱ्हा म्हणजे वरीलप्रमाणें विषें भरल्यावर तलवार बांधून ठेवित व सहस्त्रपुटी अभ्रकाप्रमाणेंच वर्षानुवर्षे प्रयोग करीत. आतां असल्या प्रयोग झालेल्या तलवारी मात्र कुठेंच होत नाहींत.

जव्हेर कसे देतात.

जव्हेर पानावर कसें उमटतें असा कित्येकांस प्रश्न पडतो. यासाठीं पुढील कृति आहे. उत्तम चंद्रवट ठोकून त्याचा पत्रा तयार करावयाचा. जें वीष पसरावयाचें असेल त्याचें मिश्रण या पत्र्यावर तयार करावयाचें व मग तें जरूर त्या तलवारीच्या पत्र्यावर पसरून द्यावयाचें. नंतर ज्याप्रमाणें नक्षी पाहिजे असेल त्याप्रमाणें तो पत्रा सारखा दाबून घेवून त्यावर मेणाची बारीक पोळी दाबून बसवावयाची. नंतर त्यावर दुसरे एक तलवारीचें पातें सारखें दाबून बसवून ती तलवार बांधून ठेवावयाची. दुसऱ्या दिवशीं तलवार धावड्याच्या अगर खैराच्या अगर रायणीच्या कोळशाच्या अग्नींत टाकावयाची. नंतर घणानें गरम गरम

जव्हेर पानावर कसें उमटतें.

ठोकून ती तलवार विषाचें पाण्यांतच थंड करावयाची. सर्व विष एकत्र मिसल्यावर पाहिजे तसें जव्हेर पानावर उमटलेलें दिसतें. कांहीं कांहीं ठिकाणीं प्रथम नक्षी तलवारीच्या पात्यावर कोरून घेतल्यावर त्यावर विषाचें मिश्रण पसरून तलवारीच्या पात्याची जूट बांधून तापविण्याची रीत आहे. ही नक्षी दोन्ही बाजूंनीं कोरतात. पत्रें घ्यावयाचे ते हत्तीपगी किंवा रामपुरीचेच घेतात. मधील मसाला बाहेर जावूं नये म्हणून पत्रे चांगल्या रीतीनें वळवून घेतात. वरील प्रकार करण्यास खूपच श्रम पडतात, व म्हणून वरील दोन्ही प्रकारच्या तलवारींची किंमत जास्त असते.

सकेला तयार करण्याची कृति.

हा वर जो दुसरा प्रकार सांगितला तो प्रकार सकेला तयार करण्याचा आहे. असा हा सकेला तयार करण्यास एक मण पोलाद व सात वर्षांचा काल लागतो आणि म्हणूनच त्याला किंमतही तशीच पडते. पूर्वीच्या लोकांत अशी म्हण होती कीं,

"*होय सकेला, तो जाय अकेला.*"

या वरूनच सकेला वाळगणाराचा आपल्या तलवारीवर केवढा मोठा विश्वास असे हें दिसून येतें.

खंडेराव महाराज व सकेले.

कै. श्रीमंत खंडेराव महाराजांनीं येथें अभ्रदार सकेले तयार करून घेतले होते. त्यां सकेल्यापैकीं कांहींची किंमत रुपये सातशें पडली आहे असें खड्ग परिक्षा या पुस्तकावरून दिसून येतें. या सकेल्यांचा कारागीर शिकलगीर केशवलाल खारीबाववाला या नांवानें ओळखला जात असे. तो रावपुऱ्यांत रहात असे. त्याच्या तलवारींचा सर्वत्र प्रसार झालेला आहे.

पोलादास कठीण पाणी.

पोलादास कठीण पाणी पाजण्याची रीत अशी असे. पोलादी हत्यार अग्नीमध्यें ठेवून तें लालबुंद झाल्यावर चिमट्यानें उचलून लागलेच थंड पाण्यांत बुडविलें म्हणजे त्या हत्यारास कठीण पाणी चढे.

जव्हेर भरण्याचें काम हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं होत असे. मुख्य मुख्य खालीलप्रमाणें होतीः—

जव्हेर भरण्याचीं स्थळें.

१. जोधपुर २. जयपुर ३. उदेपुर
४. वडोदें ५. रामपुर ६. सिरोही
७. पालनपूर ८. हैदराबाद ९. राजपीपळा
१०. ग्वाल्हेर वगैरे.

कसीस म्हणजे काय ?

तलवारीस कसीस लावण्याची कृति सांगण्यापूर्वी कसीसचा अर्थ काय तो पाहूं. सोन्यास कस लावून तें जसें किती नंबरी आहे हें पाहतात, त्याच प्रमाणें तलवारींत वीप—जव्हेर—किती आहे हें ज्या कृतीनें पाहतात तीस कसीस म्हणतात. या वरून एवढें स्पष्ट होतें कीं, जी तलवार जव्हेरदार अगर अभ्रदार असेल तीवरच कसीस लागूं शकेल.

इराणी लुकण व कसीस.

पूर्वी इराण व तुर्कस्थानकडून कसीसचें तयार लुकण येत असें; परंतु हल्लीं लढाई जोरांत असल्यानें हें लुकण इकडे येत नाहीं. इराणची कसीस जितकी तजेलदार असते तितकी येथील नसते असें अनुभवांतीं दिसून येतें.

आपल्याकडील कसीस लावण्याची कृति.

आपल्या भारत देशांतील कसीस लावण्याची कृति खालीलप्रमाणें आहे. फटकडी—ज्याला तुरटी म्हणतात ती—घेवून तिची बारीक वस्त्रगाळ पूड करून मघा नक्षत्राचें पाण्यानें शिकल केलेल्या तलवारी धुवून काढल्यावर त्यावर तुरटीची ही पूड तलवारीस चोळून पाणी लावीत जावें. सारखें बोटानें घासीत राहिल्यास त्या तलवारीवर काळा रंग चढत जातो. नंतर तलवार रानशेणीच्या राखेनें घासून घ्यावी, व वाळवावी. नंतर तिच्यावर तिळाचें अगर नारळाचें तेल लावून ती म्यान करून ठेवावी. असें केलें म्हणजे जव्हेर व अभ्र नकशीदार

बाहेर येतें. जव्हेर काळे असतें व अभ्र सफेद असतें. एका तलवारीस कसीस लावण्यास निदान अर्धा-तास तरी घालवावा लागतो. पाण्याची बादली जवळ ठेवून तलवारीस सारखें पाणी देत जाणें याच कृतीस कसीस असें म्हणतात.

## जव्हेराचे प्रकार

जव्हेराच्या तीन जाती आहेत :-१. उत्तम चंद्रवट, कित्येक ठिकाणीं यास मोमिया म्हणतात. हें नरम असतें. याचें जव्हेर वाटोळें, परंतु कबुतराच्या डोळ्यासारखें असतें, याचा रंग काळा असतो.

२. हत्तीपगी :-हें वरच्यापेक्षां थोडें कठीण, जव्हेर लांबट, काकडीच्या बियांसारखें, रंग काळा. हें इराणी तलवारींत मोठ्या प्रमाणांत आढळतें.

३. रामपुरी :-हें फार कठीण असतें. जव्हेर बारीक मुंग्याप्रमाणें, रंग काळसर. हें रामपुर जवळच्या एका खेड्यांत बनतें.

---

# उपसंहार

श्रीप्रतापशस्त्रागाराच्या निमित्तानें तयार करण्यांत आलेल्या या ग्रंथांत शस्त्रविद्येचें त्रोटक वर्णन थोडक्यांत दिलें आहे. हल्लींच्या काळांत शस्त्रविद्येकडे फारच थोड्यांचें लक्ष असल्यानें आपल्या भारत देशांत व परदेशांत पूर्वीं कोणत्या प्रकारचीं शस्त्रें तयार होत असत त्यांचा थोडक्यांत इतिहास देण्याचें धाडस केलें आहे.

पूर्वकालीं म्हणजे पांच हजार वर्षांपूर्वीं ऋषिमुनि आणि राजेमहाराजे यांनीं धनुर्वेदाच्या रूपानें नाना प्रकारचे शोध करून निरनिराळ्या प्रकारचीं शस्त्रें निर्माण केलीं होतीं. त्या वेळेस त्या शस्त्रांनीं जगण्यामरण्याच्या गोष्टी होत्या. अर्थात् त्या शस्त्रांची निगा उत्तम प्रकारानें ठेविली जात असे. हळू हळू तो वेळ नष्ट होऊन आपल्या कम नशिबानें आपल्यावर निराळे सत्ताधारी आल्यानें आपलीच स्थिति बदलून आपल्या शस्त्रास्त्रांस उतरती कळा लागली. शस्त्रविद्येच्या ग्रंथांचा नाश करण्यांत आला व कित्येक जाळून टाकण्यांत आले. वरील आक्रमणांतूनहि कांहीं वस्तू व थोडे ग्रंथ राहिले; परंतु त्यानंतर आपल्यावर असें एक सत्ताधारी सरकार आल्यानें व नऊ इंचापेक्षां जास्त मोठें शस्त्र कोणीहि वाळगूं नये असें फर्मान झाल्यामुळें प्रत्येकानें आपल्याजवळील शस्त्रें आपल्या हातांनीं नाना प्रकारांनीं नाहींशीं केलीं. यांतूनहि ज्या कोणाजवळ जीं जुनीं शस्त्रें राहिलीं तीं सरकारांनीं आपल्या कबजांत घेऊन त्यांतील महत्त्वाचीं शस्त्रें युरोपांतील पदार्थ संग्रहालयांत ठेविलीं. बाकीचीं उरलेलीं कांहीं शस्त्रें हिंदुस्थानांतील मोठमोठ्या शहरीं पदार्थ संग्रहालयांतून लोकांनां पाहाण्याकरितां लाविलीं गेलीं व बाकीच्यांचा नाश केला गेला.

संस्थानांतील राजेमहाराजे यांनीं आपल्या संग्रहांत असलेल्या उत्तमोत्तम तलवारी एडवर्ड बादशहांच्या संग्रहालयाकरितां नजर केल्यामुळें कित्येक नामांकित शस्त्रें भारत देशाला पारखीं झालीं. त्या सर्व शस्त्रांचा इतिहास नांवनिशीवार इंग्रजी स्ट्रँड नांवाच्या मासिकांत मि. डब्ल्यु. बी. हार्टीक यांनीं सप्टेंबर सन

राजपुतान्यांत मेवाड प्रांतीं तलवारी इतक्या उत्तम करीत असत कीं, तलवारीचें टोंक धरून मुठीला लावीत. आजही अशा तलवारी कोठें कोठें आढळतात. या तलवारींचा ध्वनि ठणठणीत असता. या तलवारीला ' करवाल ' या नांवानें संबोधितात.

चांपानेरी, पालनपुरी, जुनी गुजरात यांचे घाट जरी निराळे आहेत तरी त्यांच्यावर प्रत्येकीं पावणेतीन नळच कारागिरानें दाखविल्यामुळें पुष्कळ लोकांची दिशाभूल होते. अशा लोकांनीं तलवारीच्या खजान्यांत असलेल्या छापाकडे पहावें म्हणजे त्या तलवारीची ओळख त्वकर पटेल. कित्येक कारागिर छाप मारण्याचेंहि टाळतात. अशा वेळीं तलवारीची ओळख तिच्या घाटावरूनच करणें भाग आहे. चांपानेरी तलवारीच्या खजान्यांत ' त्रिशूळ छाप ' असून पालनपुरी तलवारीच्या खजान्यांत ' चंद्र ' काढून त्यांत ' या अली ' अशीं अक्षरें घातलीं आहेत. जुनीगुजरात या तलवारीवर कारागिरानें खजान्यांत ' कट्यारीचें चिन्ह ' दाखविलें आहे. असें जरी असलें तरी एका गावांत अनेक कारागिर असल्यानें त्यांनीं आपल्या चिन्हांत थोडाफार व्यक्तिगत फरक केलेला आढळून येतो. तसेंच शिरोही तलवारीच्या खजान्यांत ' कट्यार छाप ' कोठेंकोठें पाहाण्यांत येतो. मुसलमान लोकांनीं चंद्राचीं चिन्हें केलेलीं पुष्कळ तलवारीवर दिसतात.

विजय माळा म्हणजे काय? तर माळेचा अपभ्रंश माळा झालेला दिसतो. आपल्या तलवारीला प्रत्येक ठिकाणीं युद्धांत विजय मिळाचा म्हणून या तलवारीच्या गळ्यांत माळ घालून तिचा सत्कार करीत असत. अर्थात् ही माळ वरून घालून राहाणार नाहीं म्हणून ज्याप्रमाणें तलवारीवर जव्हेर, अभ्र यांचीं चिन्हें उमटवितात, तोच प्रकार या माळेंत तयार करीत असत. जव्हेर व अभ्र कसें भरतात हें प्रकरण पूर्वीं लिहिलें असल्यामुळें आतां निराळें लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

माळा दोन प्रकारच्या असतात. एक अगदीं गळ्यांत घालतात त्यासारखी, आणि एक तिरपी. तिरपी माळा म्हणजे शत्रूला तिरपा कापावयाचा याचें तें द्योतक आहे इतकेंच.

# परिशिष्ट १

## शिकल करण्याबद्दल.

शिकल करणें.

तलवार गंजली किंवा खराब झाली म्हणजे तिला साफ करावयाची असेल तर तिला आवळ्याचा अर्क, लिंबाचा रस हे लावून रॉकेल तेलांत बुडवून ठेवावी. दुसरे दिवशीं ती शिकलगिरास द्यावी. शिकलगिर प्रथम त्या तलवारीस खोबऱ्याचें किंवा तिळाचें तेल लावील. नंतर त्या तलवारीच्या पानावर कुरूंदच्या दगडाची वस्त्रगाळ पूड टाकून आपल्या उपकरणांनीं ती तलवार हळूहळू घासून तिचा गंज रगडून रगडून काढून टाकील. जसजसा मळ वर येत जाईल तसतसा मांजरपाटाचे कापडानें तो पुसून टाकील. याप्रमाणें मळ कमी झाल्यावर तो पुन्हां एकदां असाच दुसरा हात मारील. कुरूंदच्या दगडाच्या भुकीला समाधा म्हणतात.

थंड कापडगादी.

अशा रीतीनें तलवार पूर्ण साफ झाल्यावर शिकलगिर त्या तलवारीस नुसत्या कापडाची घडी करून आपल्या उपकरणांनीं त्या कापडाच्या घडीवर दाब टाकून घासून काढील. अशा रितीनें कापडाच्या घासण्यास थंड कापडगादी म्हणतात.

गरम कापडगादी.

अशा रीतीनें तलवार साफ केल्यावर बनातीच्या तुकड्याच्या घडीनें पुन्हां तें हत्यार स्वच्छ करून घेईल. यास गरम कापडगादी म्हणतात.

मजुरी.

जितकी तलवार स्वच्छ करून काढावी तितकी ती उत्तम जातीवंत निघते. तलवार उत्तम काढण्यास एक दिवस तिची सफाई केली पाहिजे. शिकलगिरास कामाप्रमाणें मजुरी द्यावी. एक तलवारीस दिवसभर कापडगादी केल्यावर एक रुपाया द्यावा. रोजिंदारीनें शिकलगिर बसविला तरी त्यास रोजचा एक रुपाया याप्रमाणें मजुरी द्यावी. लागणारें सामान तेल, समाधा आणि कपडा वगैरे मात्र आपणच दिलें पाहिजे. नाहींतर ते आपल्या जवळील घाणेरडे कपडे वापरतात त्यामुळें शस्त्र खराब होतें.

तलवार साफ झाल्यावर तिला रंगूनचें तेल, जैतूनचें तेल, व्हॅसलिन अगर खोबरेल लावून ठेविलें म्हणजे तलवारीस गंज चढत नाहीं.

गंज लागूं नये ह्मणून.

शिकलगिर ज्या उपकरणांनीं तलवार घासून साफ करतो त्यांचीं नांवें खालीलप्रमाणें :—

शिकलगिरांचीं उपकरणीं.

कुरूंदची सराण म्हणजेच सहाण, २. सहाण खेचण्याचे चामडी पट्टे, ३. नालेच्या आकाराचें चक्र, ४. चपरास म्हणजेच लाकडाचा हप्ता कुरूंदच्या दगडासह, ५. म्हशीच्या शिंगांत बसविलेला कुरूंदचा दगड, ६. मसकला वट पोलादाचा, ७. कोरण्या लहान व मोठ्या, ८. तारेचा ब्रश, ९. लोखंड कापण्याच्या छिण्या, १०. हरणाचें शिंग, ११. ओपनी, १२. दगडाच्या कोरण्या.

या शिवाय तलवार ठेवण्यास फळी, तलवार घासण्यास कुरूंदचा दगड, मेणकापडाचा तुकडा, खादी अगर मांजरपाटाचे तुकडे, बनातीचे तुकडे वगैरे सामान शिकल करण्यास लागतें. तलवारीस गरम कापडगादी केल्यावर गाळीव रक्षेनें तलवार कोरडी करून सफेद कपड्यानें पुसून काढून तिला तेल लावून ठेवावें.

तलवार सतेज ठेवण्यास व तिचें पाणी कायम ठेवण्यास आवळा, बेहडा व हिरडा यांचें चूर्ण पाण्यांत भिजवून तें या तलवारीस लावावें.

तलवारीचें पाणी कायम.

चांदीच्या किंवा सोन्याच्या मुठी त्याचप्रमाणें तारफणी म्हणजे तलवारीच्या म्यानावर फीत लावतात त्या ठिकाणीं लावलेली कोणतीही धातूची पट्टी, तेनाल म्हणजेच कवजा, मोनाल म्हणजेच नक्की किंवा नोंक, हीं साफ करण्यास चॉक व खोबरेल तेल किंवा व्हॅसलिन इत्यादि पदार्थ लागतात. यावर पाणी लावल्यास मुठी काळ्या पडण्याचा संभव आहे.

इतर भाग साफ करणें.

शिकल करण्याच्या बहुतेक हत्यारांत कुरूंदचा दगड बसवावा लागतो. तो दगडच तलवारी साफ करूं शकतो. खंबायतला कुरूंदचा दगड बारा रुपये मण मिळतो. बडोद्यास हा दगड फारच महाग मिळतो. या दगडाची भुकटी करण्याचें काम फार मेहनतीचें आहे. ही भुकटी दोन प्रकारची करतात. एक भरभरीत व दुसरी बारीक. प्रथम बारीक वापरतात व नंतर कापडानें घासतांना भरभरीत वापरतात.

कुरूंदचा दगड.

शिकलगिर आतां कांहीं संस्थानांतून दिसतात तेवढेच. संस्थानाबाहेर राहण्याऱ्या शिकलगिरांनीं तर पोटासाठीं आतां दुसरे धंदे स्वीकारले आहेत. हत्यारबंदीच्या कायद्याचे योगानें ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानांतील प्रजाजनांस दुर्बल, परावलंबी, भित्रे तर केलेच आहे, परंतु त्या बरोबर त्यांपैकीं कित्येकांस पिढीजात कारागिरीपूर्ण अशा धंद्यासही मुकावयास लावलें आहे. शिकलगिरांचा धंदा आतां जवळ जवळ नष्ट झाल्याकारणानें ज्यांच्या जवळ हत्यारें आहेत त्यांच्या हत्यारांची शिकल बिघडून गेली आहे.

शिकलगिरांची स्थिति.

" हार जीत होना दैवाधीन है। पर परमार वीरोंके लिये यह अरुर कहां आ सकता है की ध्रुव अपने स्थानसे भलेही भ्रष्ट हो जाएं; सुमेरु अपनी अचलता छोड दें; पर परमार लोग इसतराहसे भाग जानेवाले नहीं है।

—रामराय—



जयास जिवाचें वाटे भयें तेणें क्षात्रकर्म करूं नये
कांहीं तरी करून उपाये पोट भरावें।

—श्रीसमर्थ—

# परिशिष्ट २

## कांहीं महत्त्वाच्या गोष्टी.

तलवारीचे बाबतींत खालील गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेतः—

१. केळीच्या गाभ्याचें सत्व काढून ताकांत भिजवून एक पत्र्याची पेटी तलवारीच्या आकाराची करून तींत तलवारीचें पान भिजत घालावें. सात दिवसांनीं तें काढावें. असें पाणी प्यालेली तलवार दगडावर सुद्धां तुटत नाहीं.

२. रतनज्योतचें दूध, मेंढीच्या शिंगाची राख व काळ्या धोतऱ्याच्या पानाचा व बोंडाचा रस काढून व त्यांचें पाणी तयार करून त्यांत रोज एक तासप्रमाणें २१ दिवस तलवार ठेविल्यानें तलवारीचें पान चिवट होतें. तुटत नाहीं.

३. हरीण, घोडी, शेळीचें दूध आणि तालगर्भ ताडी हीं सर्व एकत्र करून त्यांचें पाणी तलवारीस द्यावें. या योगें तलवार सतेज होते.

४. घाव वरा होवूं नये अशी इच्छा असल्यास सोमलास पाण्यांत घोटून तयार केल्यावर तलवारीच्या पानास पाणी पाजावें. या पाण्यानें अभ्र वर येतें.

५. घाव नरम ठेवण्याची इच्छा असल्यास फक्त गोडे तेल आणि मघा नक्षत्राचे पाण्याचा उपयोग करावा.

६. सकेला कठीण करावयाचा असल्यास चामडें, मीठ व कांच हीं एकत्र करून त्यांचें पाणी सकेला तलवारीस द्यावें.

७. घाव नरम करावयाचा असल्यास खोबरेल तेलाचा उपयोग करावा.

८. घाव थंड करावयाचा असल्यास शिशाचें पाणी द्यावें.

९. केळीच्या क्षारांत "मुर्दाडसिंग" मिसळून तें मिश्रण शस्त्रांस लाविल्यानें व त्यावर नेहमींप्रमाणें पाणी दिल्यानें हत्यार भंग पावतें.

१०. "क्षारेकदल्यामथितेनयुक्ते दिनोषिते पायितमायसं यत्।
सम्यक् छितंचाश्मनि नैति भंगं नचान्यलोहेष्वपि तस्य कौंठ्यं." ॥

( बृहत् संहिता ) ( अ. ५९ )

अर्थः—केळीचा क्षार ( राख ) अहोरात्र ताकानें युक्त करून ठेवून तें पाणी ज्या लोखंडास दिलें व उत्तम पाजवलें, तें दगडावरही नाश पावत नाहीं व अन्य लोखंडावरही तें कुंठित होत नाहीं.

तलवारीचे वारावर जुने उपाय.

तल्वारीचा वार लागल्यास गुंजांचें पानांचें सरवतांत मध, लिंबू टाकून पाजावें म्हणजे शक्ति येवून जखम स्थिर होते. नंतर जखमेवर आवळा, बेहडा आणि शंखजिरे यांची पावडर टाकून पट्टी बांधावी म्हणजे जखम भरून येते.

---

# परिशिष्ट ३

## मुठीवर चांदीसोन्याचा वर्ख चढविण्याबद्दल व रसाण्याचे कामाची माहिती.

मुठीवर चांदीसोन्याचा वर्ख चढविण्याबद्दल व रसाण्याचे कामाची माहिती.

सोनेचांदी चढविण्याचें काम करणाऱ्या लोकांना रसाणे म्हणतात. हें काम करण्यापूर्वी मुठीस प्रथम गरम करून तिचा मळ जाळून टाकल्यावर ती कानसीनें घासून साफ करतात. मूठ पोलादाची असल्यास तिच्यावर टाकी देतात. टाकी दिल्याखेरीज चांदी चढणार नाहीं. चांदी चढविण्यापूर्वी टाकी उत्तम केली गेली पाहिजे. सोनें चढविण्यापूर्वी चांदी चढवावी लागते. नुसतीच चांदी चढविणें असल्यास अग्नि तेज लागतो. सोनें चढवितांना मात्र अग्नि मंद पाहिजे असतो. टाकी देवून झाली म्हणजे आडव्या कानसीनें खोल चिरा पाडतात. अशा रीतीनें चिरा पाडून झाल्यावर लिंबाचा रस लावून ती सुकवितात. नंतर ती मूठ कोळशाचे निखाऱ्यावर तापवितात. सर्व बाजूंनीं ती मूठ सारखी तापली जाईल अशी काळजी घेतात. चांदीचा वर्ख उपयोगांत आणण्यापूर्वी तो टिपून घेतात. कोळशाचे निखाऱ्यांत तापविलेली ती मूठ बाहेर काढून झाडून पुसून साफ केल्यावर चांदीच्या वर्खाचें एक एक पान चिमट्यानें उचलून त्या मुठीवर बसवितात. नंतर अकीकच्या कलमानें तो घासून घासून बसविल्यानंतर तो मुठीशीं एक जीव होण्याकरितां फिरून ती मूठ कोळशाचे विस्तवावर तापवितात. याप्रमाणें जितकी चांदी चढवावयाची असेल तितकी चढवितात. जास्त वर्ख चढविला तर तो १५ वर्षे खराब होत नाहीं असा अनुभव आहे. ज्या मुठीवर सोन्याचा वर्ख चढवावयाचा असेल त्या मुठींना प्रत्येकीं दीड तोळा चांदीचा वर्ख चढविल्यावर आठ आणे भार सोन्याचा वर्ख चढवावा म्हणजे ती मूठ उत्तम सोन्याची दिसते. कित्येक लोक चार आणे भार सोनें वापरून सोन्याची मूठ तयार करतात.

चांदी चढविण्याची दुसरीही एक रीत आहे. चांदीचे पातळ पत्रे करून त्यांचे बारिक बारिक तुकडे करावे. ते चांदीचे बारिक तुकडे फायर प्रुफ कांचेच्या भांड्यांत घालून त्यावर ते सर्व तुकडे बुडून जातील इतकें नायट्रिक ॲसिड टाकावें. तें भांडें मंदाग्नीवर ठेवावें. थोडयाच वेळांत चांदीचें पाणी होतें. पाणी झाल्यावर तें भांडें विस्तवावरून खालीं उतरून घ्यावें. चांदीच्या वजनाइतकें वडागरी मिठाचें पाणी करून तें पाणी त्या चांदीच्या भांड्यांत ओतावें म्हणजे आंतील चांदी दह्याप्रमाणें घट्ट होईल, नंतर ती चांदी स्वच्छ पाण्यानें धुवून आंतील घाण पाणी काढून टाकावें. याप्रमाणें तीन चार वेळां करावें. सायनेट ऑफ पोटॅशचें पाणी घट्ट झालेल्या चांदीवर टाकावें म्हणजे फिरून त्या घट्ट चांदीचें पाणी होईल. पाण्याचा रंग पिवळा होईल. नंतर हें मिश्रण गाळून एका भांड्यांत भरून ठेवावें. याप्रमाणें हें मिश्रण तयार झाल्यावर त्या मिश्रणांत तांबें चढविलेली मूठ सोडून द्यावी. पांच मिनिटांनीं बाहेर काढून वजन करून पहावी म्हणजे तिचें वजन वाढलेलें आढळून येईल. चांदी जितकी जास्त चढविणें असेल त्याप्रमाणें ती मूठ त्या मिश्रणांत जास्त वेळ ठेवावी. या मिश्रणाचें प्रमाण साधारणतः खालीलप्रमाणें आहे:—

चांदी चढविण्याची दुसरी रीत.

| | | |
|---|---|---|
| चांदीची भुकी | ... ... | १ भार |
| नायट्रिक ॲसिड | ... ... | २ भार |
| वडागरी मीठ | ... ... | १ भार |
| सायनेट ऑफ पोटॅश | ... | ४ भार |

सोन्याचा वर्ख चढविणें असल्यास प्रथम चांदीचा वर्ख चढवून घ्यावा म्हणून पूर्वीं सांगितलेंच आहे. चांदीचा वर्ख चढवून झाल्यावर मूठ मंद विस्तवावर ठेवावी. ती तापली म्हणजे तिच्यावर सोन्याचें पान लावावें. हीं पानें लावते वेळीं मुठीच्या तोंडांत एक लाकूड ठोकून बसवावें. यामुळें लाकडाला धरून वर्खाचीं पानें लावणें

सोनें चढविणें.

घासावीत, इतकीं कीं, वर्खाचा व मुठीचा एकजीव झाला पाहिजे. या कलमा नाना प्रकारच्या कराव्या लागतात. गोल, चप्पट, लंबगोल वगैरे. कारण मुठीच्या मानेच्या भागांत जे जे खाडे असतात त्यांत वर्ख बसविल्यावर ताप देत जावून चोळतां आलें पाहिजे. असें केल्यावर वर्ख जितका जास्त बसवाल तितकी मूठ जास्त तजेलदार होईल. एका मुठीस कमींत कमी अर्धा तोळा वर्ख लावावा. सोनें उत्तम देवूनच वर्ख तयार करून घ्यावा. सोनें हिणकस असेल तर काम वाईट होतें.

वर्खासंबंधीं इतर.

चांदी सोन्याच्या भावावर वर्खाची किंमत अवलंबून असते. हल्लीं चांदीचा वर्ख अहमदाबाद येथें पावणेदोन रुपये तोळा व बडोदें येथें दोन रुपये तोळा याप्रमाणें मिळतो. अहमदाबादेस हा वर्ख वाटेल तेव्हां मिळतो. बडोद्यास मात्र आधीं कळविलें असल्याशिवाय मिळत नाहीं. बडोद्यास नजरबागेसमोर राजगुरूचे पोळेंत हा वर्ख तयार करतात. चांदीचा वर्ख चढविण्यास दर तोळ्यास दोन रुपये व सोन्याचा वर्ख चढविण्यास दर तोळ्यास पांच रुपये याप्रमाणें मजुरी द्यावी लागते. लोखंड व पोलाद खेरीज इतर धातूवर चांदीसोन्याचा वर्ख सहज चढवितां येतो. पोलादावर तो चढविणें झाल्यास प्रथम तांब्याचा मुलामा द्यावा लागतो.

तांबें चढविण्याची रीत.

लोखंडी अगर पोलादी मुठीवर तांबें चढविणें झाल्यास पुढीलप्रमाणें वस्तू घ्याव्या.

| | | |
|---|---|---|
| सायनेट ऑफ पोटॅश | ... | ६ औंस |
| कारबोनेट ऑफ पोटॅश | ... | ४ औंस |
| अमोनियाचें पाणी ... | ... | २ औंस |
| मोरचुद ... ... | ... | २ औंस |
| पाणी ... .... | ... | १ गॅलन |

या वस्तू घेतल्यानंतर थोडें पाणी ऊन करून त्यांत मोरचूद विरघळूं द्यावा. तो थंड झाल्यावर कारबोनेट ऑफ पोटॅश आणि अमोनियाचें पाणी त्यांत टाकावें.

हें एकत्र झाल्यावर त्या पाण्याच्या बुडाशीं एक प्रकारचा साका जमून जाईल. बाकीच्या पाण्यांत सायनेट ऑफ पोटॅश विरघळूं द्यावा. नंतर हीं दोन्हीं मिश्रणें एक करावीं. म्हणजे मोरचुदाचा रंग बदलून स्वच्छ होईल. हें एक गॅलन पाणी एका भांड्यांत ओतून ठेवावें. बिलकूल हलवूं नये. न हलविल्यामुळें त्या पाण्यावर एक प्रकारचा तवंग येईल. तो सावकाश काढून घ्यावा. काढून घेतलेला तवंग दुसऱ्या भांड्यांत ठेवावा. ज्या मुठीवर तांबें चढवावयाचें ती मूठ कॅस्टिक ऑफ पोटॅशचे पाण्यांत टाकून स्वच्छ धुवून काढावी. नंतर

| | | |
|---|---|---|
| नायट्रिक ॲसिड ... | ... | २ औंस |
| सल्फ्यूरिक ॲसिड | ... | १ औंस |
| पाणी ... | ... ... | दीड गॅलन |

या मिश्रणांत ती मूठ बुडवून काढावी. नंतर पुन्हां घासून साफ व स्वच्छ करावी. बॅटरींतील जस्ताचे रॉडला असलेल्या तारेच्या दुसऱ्या टोंकास ती मूठ बांधावी आणि तारेनें एक तांब्याचा तुकडा बांधावा. याप्रमाणें बॅटरीस बांधलेली मूठ व तांब्याचा तुकडा हीं दोन्ही आरंभीच्या मिश्रणांत सोडून द्यावीं म्हणजे त्या पाण्यामध्यें विजेचा प्रवाह सुरू होवून त्या मुठीवर तांब्याचा मुलामा चढेल.

तांब्याच्या वस्तुवर पारा.

तांब्याची मूठ, तेनाल अगर मोनाल या वस्तू विटेच्या चुऱ्यानें खूप पाणी टाकून घासून घेतल्यावर त्यांत थोडा पारा सामील करून वरील वस्तूवर घासावा. असें केलें असतां वस्तू शुभ्र चांदीच्या रंगासारखी होईल. नंतर त्या वस्तूवर सोन्याचीं पानें चढवावीं म्हणजे वस्तू सोन्याच्या पानाची होईल.

चांदीच्या मुठीस पॉलीश.

चांदीच्या मुठीस पॉलीश अगर झिलाई करावयाची असल्यास पाईप क्लेची वस्त्रगाळ पूड घेवून ती शुद्ध केलेल्या टारटरीच्या वस्त्रगाळ पुडींत चारास एक या प्रमाणांत मिसळून ठेवावी. या मिश्रणानें चांदीची मूठ, नक्षी, अगर दुसरी कोणतीही चांदीची वस्तू घासली असतां पॉलिश अगर झिलाई चांगल्या रीतीनें होते.

बलमार्त भयोपशान्तये ।

भावार्थः—दुःखितांचें भय निवारण करण्यासाठींच शक्तीचा उपयोग झाला पाहिजे'



जो गत ग्रहा गजेंद्र की सो गत भै है आज
बाजि जात है बुंदेलनकी राखो बाजी लाज ।

—छत्रसाल—

चांदीचा मुलामा चढविण्याची भुकटी तयार करावयाची असल्यास १२ औंस स्वच्छ पाण्यांत १ औंस सिल्व्हर नायट्रेड विरघळल्यानंतर २ औंस सायोनाईड ऑफ पोटॅश टाकून त्या मिश्रणाचा एक जीव होवूं द्यावा. नंतर त्यांत भिजूं शकेल इतकें प्लॅस्टर ऑफ पॅरिस टाकून ठेवावें म्हणजे पूड तयार होईल. स्वच्छ केलेल्या मुठीवर या पावडरनें घासलें असतां तिच्यावर चांदीचा मुलामा चढेल; परंतु विजेनें चढविलेल्या चांदीप्रमाणें पुष्कळ दिवस टिकणार नाहीं.

मुलामा चढविण्याची भुकी.

'प्यारिस वेड' नांवाची पूड घेवून शामॉय लेदरनें सोन्याची मूठ साफ केली असतां त्या मुठीस सुंदर झिलाई चढते.

सोन्याच्या मुठीस झिलाई.

नायट्रिक ॲसिड व सल्फ्युरिक ॲसिड एक एक पैसाभार घेवून तें पाण्यांत टाकून मिश्रण तयार करावें. रुप्याची अगर चांदीची काळी पडलेली मूठ प्रथम तापवून थंड झाल्यावर या मिश्रणांत कांहीं वेळ ठेवावी. नंतर साफ धुतल्यावर काळेपणा नाहिंसा होईल.

काळें रुपें स्वच्छ करणें.

---

# परिशिष्ट ६

## हस्तिदंती मुठीची सफाई.

हस्तिदंती मुठीची सफाई.

पुष्कळ वर्षे झालीं म्हणजे हस्तिदंताचा रंग बदलून तो फिक्का पडत जातो. तो साफ करण्याकरितां एका कांचेवर ठेवून त्यावर कांचेचीच पेटी पालथी घालावी. ती पेटी कांहीं दिवस उन्हांत ठेवावी. रोज तो हस्तिदंत बाहेर काढून पाण्यानें स्वच्छ धुवावा. असें कांहीं दिवस करीत राहिल्यास रंग पुन्हां पूर्ववत् पांढरा स्वच्छ होईल. हस्तिदंत उन्हांत उघडा ठेविल्यास त्यास चिरा पडतात.

हस्तिदंताला पॉलिश.

हस्तिदंत कांचपेपरनें प्रथम घासावा. नंतर अकीकची भुकटी ओल्या कपड्यांत घेवून तो हस्तिदंत खूप घासावा. यायोगें तो चकचकीत होवून पॉलिश केल्याप्रमाणें दिसेल.

हस्तिदंतावर सोनेरी रंग.

हस्तिदंतावर सोनेरी रंग चढवावयाचा असेल तर वाफेचें पाणी, पावसाचें धरून ठेविलेलें पाणी, अगर स्वच्छ झऱ्याचें गोडें पाणी तीन शेर घेवून त्यांत नायट्राम्युरेट ऑफ गोल्ड टाकावें. या मिश्रणांत हस्तिदंत बुडवून काढावा. लोखंडाचा अगर जस्ताचा बारीक कीस घेवून त्यावर सल्फ्युरिक ॲसिडचें थोडें पाणी टाकावें. नंतर तो कीस विस्तवावर टाकल्यावर धूर निघेल. त्या धुराला वरील मिश्रणांत बुडविलेला हस्तिदंत धरावा. धूर लागल्यावर त्यावर सोनेरी रंग दिसूं लागेल.

---

" राग खंड विहंडम्, खलदलखंडम्,
अटर न मंडम्, वर मंडम्;
भुजदंड अखंडम्, तेज प्रचंडम्,
ज्योति अमंडम्, भानुप्रभाम्;
सुखसन्ताकरणम्, किलविखहरणम्,
दुर्मतिदलनम्, अतिशरणम्;
जयजय जगकारण, सृष्टिउभारण,
मम प्रतिपालन, जय तेगम्!"



" चिन्ता ताकी कीजिये, जो अनहोनी होय;
यह मारग संसारको नानक थिर नहि होय.
जो उपजे सो विनशिये, आज मरो के काल;
नानक हरगुण गाइये, छोड सकल जंजाल."

# परिशिष्ट ७

## शस्त्राला लावण्याचें तेल.

| | | |
|---|---|---|
| १. शुद्ध नारळाचें तेल | ८० | रुपये भार. |
| २. आवळ्याचा रस | ४० | ,, |
| ३. लिंबाचा रस | २० | ,, |
| ४. खाण्याची हाळद | ४ | ,, |
| ५. गुलाबाच्या फुलांचा रस | २० | ,, |

या सर्वांचें मिश्रण शुद्ध तेल राहीपर्यंत उकळवावें. नंतर त्यांत पांच रुपये भार शुद्ध मेण टाकून एक कड द्यावा व नंतर डब्यांत अगर बरणींत भरून ठेवावें. हें तेल तलवारीस लावून ठेविल्यानें तलवार गंजत नाहीं व तिच्यावर आलेला मळ कपड्यानें पुसून काढल्यास तलवारीची चमक शिकल केल्याप्रमाणें दिसते.

# परिशिष्ट ८

## तलवारीला देण्याचा धूप.

धूप.

शस्त्रांचीं ज्याप्रमाणें ही इतकी व्यवस्था ठेवावयाची अवश्यकता दिसून येते त्याप्रमाणें शस्त्राला नेहमीं धूप देत असावा. यांत धार्मिक भावना, आरोग्य यांचा तर समावेश आहेच; परंतु त्यामुळें शस्त्र बिघडत नाहीं व शास्त्रशुद्ध राहतें, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. या धुपांत खालीलप्रमाणें औषधें असतातः—

१. गुगळ ३ शेर
२. कवड्या लोभान २० रुपये भार
३. दाणेदार लोभान १० रुपये भार
४. ईसस ४ आणे भार
५. तेलीया देवदार १० रुपये भार
६. कपूरकाचली १० रुपये भार
७. नागरमोथा १० रुपये भार
८. वाळा २० रुपये भार
९. चंदन १ शेर
१०. पानडी २ आणे भार
११. नखला २ आणे भार
१२. खोबरें १० रुपये भार
१३. पांढरी सुपारी १० रुपये भार
१४. अगर ५ रुपये भार
१५. तगर ५ रुपये भार
१६. वालछड १० रुपये भार
१७. विलायची दाणें ५ रुपये भार
१८. लवंग ५ रुपये भार
१९. गोरेचन ३ वाल
२०. मरवा १० रुपये भार
२१. जटामाशी १० रुपये भार
२२. बावची १० रुपये भार
२३. केशर ३ तोळा
२४. कस्तुरी ३ वाल
२५. अंबर २ वाल
२६. गुळवेल १० रुपये भार
२७. कापूर ५ रुपये भार
२८. मायफळ १० रुपये भार
२९. जायपत्री ५ रुपये भार
३०. जायफळ ५ रुपये भार
३१. वावडिंग ५ रुपये भार
३२. तमालपत्र १० रुपये भार

३३. दालचिनी १० रुपये भार  ३४. नागकेशर ५ रुपये भार

३५. गुळ १० रुपये भार  ३६. ब्रम्ही १० रुपये भार

३७. सुगंधी मेंदी २० रुपये भार  ३८. वेलाचीं पानें १० रुपये भार

३९. कडूलिंबाचीं पानें १० रुपये भार  ४०. उपलेट ५ रुपये भार

---

## देव्युत्पत्ति

इत्थं निशाम्य देवानां वचांसि मधुसूदनः ।
चकार कोपं शंभुश्च भृकुटी कुटिलाननौ ॥ ९ ॥
ततोति कोप पूर्णस्य चाक्रिणो वदनात्ततः ।
निश्चक्राम महत्तेजो ब्रह्मणः शंकरस्यच ॥ १० ॥
अन्येषां चैव देवानां शक्रादीनां शरीरतः ।
निर्गतं सुमहत्तेजस्तच्चैक्यं समगच्छत् ॥ ११ ॥
अतीव तेजसः कूटं ज्वलंतमिव पर्वतम् ।
ददृशुस्तेसुरास्तत्र ज्वालाव्याप्तदिगंतरम् ॥ १२ ॥
अतुलं तत्र तत्तेजः सर्वदेवशरीरजम् ।
एकस्थं तदभून्नारी व्याप्त लोकत्रयंत्विषा ॥ १३ ॥

## देवा–आयुधानिददुः

ततो देवा ददुस्तस्यै स्वानि स्वान्यायुधानिच ।
शूलं शलाद्विनीष्कृष्य ददौ तस्यै पिनाकधृक ।
चक्रंचदत्तवान् कृष्णः समुत्पाद्य स्वचक्रतः ॥ २० ॥
शंखंच वरुणः शक्तिं ददौ तस्यै हुताशनः ।
मारुतो दत्तवांश्चापं बाणपूर्णे तथेपुधी ॥ २१ ॥
वज्रमिंद्रः समुत्पाद्य कुलिशा दमराधिपः ।
ददौ तस्यै सहस्राक्षो घंटा भैरव ताग्दजात् ॥ २२ ॥
कालदंडाद्यमो दंडं, पाशं चाम्बु पतिर्ददौ ।
प्रजापतिश्चाक्ष मालां ददौ ब्रम्हा कमंडलुम् ॥ २३ ॥
समस्त रोप कूपेपु निजरश्मीन्दिवाकरः ।
कालश्च दत्तवान् खड्ग तस्यै चर्मच निर्मलम् ॥ २४ ॥
विश्वकर्मा ददौ तस्यै परशुंचाति निर्मलम ॥ २७ ॥

## त्रोटक छंद

जो जिनकी तरवार निज अंगुल ते नापिये ।
तेरह् और मिलाय भाग सात को दीजिये ।
प्रथम निज मालिन नेक चहै ।
लख दुनि बडाई मर जादल है ।
दुतिये तिन के कर नेक सले ।
कर राखत ताहिं तुरंग मिले ।
तृतिय हद चंडी तग कहि ।
कब होयन ठांहि पिसा चनकी ।
चौथे लख संखनी कोप करे– ।
नुकसान से माल गमाय घरे ।
पंचमसो पद गण तेग कहें– ।
अहघात करे सोहि आप दहे ।
छटे अकुलों निही तेग छटी ।
कछु काज सरेन सदा घट ही ।
लघु खाग रखे गहरे रणमे–
जय होय जुमीड अरिके धनमें ।
निज पूर्व लक्षण भूपत ये ।
सोई त्रोटक छंट कि योजु अवे ॥

# परिशिष्ट १०

## श्री प्रतापशस्त्रागारांतील कांहीं अमोलिक हत्यारांची नांवें.

श्रीगर्भ.
अब्बासी अलेमान.
अमील.
अरबी तल्वार.
अरबी सुरा.
अलेमान तुर्की.
अलेमान पट्टणी.
अलेमान हैदरी.
इराणी तलवार.
उनाशाई तलवार.
उदेपुरी तलवार.
कच्छी तलवार.
कासवाचे पाठीची ढाल.
कट्यार (नारसिंहक).
कडाबिन.
कत्ती खातेदार.
कत्ती चिमटेदार.
कत्ती नवाजखानी.
खंजीर लेहेरेदार.
खांडा.
खांडा जसवंती.
खांडा बंदुकदार.
कत्ती नक्षीदार.
कत्ती मेवाडी.
कत्ती रामपुरी.
कत्ती हकीमखानी.
कत्ती हुसेनी.
कर्नाटकी धोप.
कम्मा दुधारी.
करपाल.
करवाल.
करवती डाव.
कलमी माळावाली.
काल्यान.
किरच.
किरपाण.
कुकरी.
कुबडी गुप्ती.
कुरानी तलवार.
खंजीर.
चतुर्भुजा तलवार.
चापानेरी तलवार.
चिलखत.
चौकला.

खांडेराय खांडा.
खारीवाव.
खुरासानी.
गटबंदी.
गद्दारा.
गायतोंडी.
गुप्ती.
गुप्ती पिस्तुलदार.
गुरज.
गेंड्याची ढाल.
गेबी सुरा.
गोमुखी करवती डाव.
गोलिया.
तनसुरा (पेशकबज).
तव्वल.
तिरेंघाटी सुरा.
तेगा.
दशावतारी.
दुधारी.
देसलशाई.
देवीकवच.
धर्मपाल.
धोप.
नागीण.
नांदोदी.

जनुबी.
जपानीमार.
जफरतकिया.
जमधाड.
जंबिया.
जव्हेरदार माळावाली.
जव्हेरदार दमास्कसी.
जहाजी.
जुनी गुजराथ.
जुल्फुकार (दुद्दा).
जोधाना.
डाव.
डुंगरपुरी.
ढाल.
परशु अंकुशदार.
परशु चंद्राकार.
परशु बंदुकदार.
पंचकला.
पारदर्शक ढाल.
पालनपुरी तलवार.
पेशकबज.
पोलादी ढाल
पोवारशाई
फरशी.
फरसा.

| | |
|---|---|
| न्याहाली तलवार. | बडोदेशाई. |
| निमचा. | बरछी. |
| निमचा कलमी माळावाला. | बंदुक तोडेदार. |
| पट्टा. | बंदुक |
| पट्टापान. | बाना |
| पत्राशाई. | बिचवा. |
| परशु. | भाला त्रिकोणी. |
| भुजीगोलिया. | भाला पेचदार. |
| मगरी. | भाला नसदार. |
| मत्स्यखड्ग. | भुजारा. |
| माडू. | सकेला पट्टणी. |
| माळावाली. | सांग. |
| मेवाडी तलवार. | सिरोही पत्राशाई. |
| मुम्राव ( मगरबी. ) | सिरोही मानाशाई. |
| रामपुरी. | सिरोही लाखाशाई देसलशाई |
| रूमीसुरा. | सिलेटची ढाल. |
| लाखाशाई. | सुदर्शन चक्र. |
| लालुवाड. | सुदानी. |
| वहागुरुतेग. | सुरी. |
| वाघनख. | सुरी अतरसुंबा. |
| विजय. | सुरी दुधारी. |
| सकेला अभ्रदार. | सूर्यकांत ढाल. |
| सोसनपत्ता. | सूंसची ढाल. |

---